करून, त्यांत एका कलमांत तर डोईपट्टीचा कर घेऊं नये ह्मणून एक अट त्याजकडून कबूल करून घेतली. ह्या तहनाम्याच्या मथाळ्यावरूनच उघड दिसतें कीं, आजपर्यंत रजपूतलोकांस, आपलेवर श्रेष्ठ कोणी नाहीं व मुसलमान बादशाहीपेक्षां आपलें महत्व व वजन फार जास्त आहे असा जो अभिमान असे, तो सर्व ते विसरून जाऊन, केवळ दिल्लीच्या दरबारांत आपला प्रवेश व्हावा व तेथें आपलें वजन व मान राहावा या गोष्टीचे ते भुकेले होऊन, व त्याप्रमाणें त्यांणीं बादशाहास विनंत्या करून, त्याजकडून मनसबी आणि फर्मान मिळविले. राण्याबरोबर तरी बादशाहानें इतक्या अटींचा तह कबूल केला याचें कारण, खुद्द राणा व इतर रजपूत संस्थानें जबरदस्त होऊन बादशाहाला डोईजड झालीं होतीं. तेव्हां, अशा कचाट्यांतून आपली अब्रू व नांव कायम राहावें ह्मणून, अनायासें आपल्याकडे येऊन तहाचें बोलणें लावणाऱ्या राण्याचीं ह्मणणीं व त्याच्या अटी, हीं बादशाहानें सर्व कबूल केलीं. अजितसिंगाचें जें वर्त्तन घडलें त्यावरून पाहतां असें दिसतें कीं, कित्येक लोभी व लब्धप्रतिष्ठ रजपुतांस, सर्व मानसन्मान, दातृत्व आणि आदरसत्काराचा उगम किंवा झरा काय तो बादशाहाचें दरबारच आहे, असें वाटत असे. आणि, या समजावर ते आपला जात्यभिमान सोडून बादशाहाकडे मिळाले व त्यानें दिलेल्या मोठमोठ्या पदव्या स्वीकारून, मेवाड वगैरे ठिकाणचे राजांच्या बरोबरीचे आपण झालों, असा गर्व ते वाहूं लागले. बादशाहानें दिलेले अधिकार व पदव्या आपल्याकडे आल्यावर आपण मेवाडच्या राण्याचे अगदीं बरोबरीचे, किंबहुना त्याचेपेक्षां जास्त योग्यतेचे झालों, असें अजितसिंगासारख्यांस वाटूं लागलें; परंतु त्यांत कांहीं मोठेपणा नव्हताच. अधिकार व संपत्ति हीं जरी राण्याच्या बरोबरीचीं झाली तरी, मेवाडच्या राण्याचें

"त्याचप्रमाणें, सिन्सिनी येथील जयाच्या वेळीं बोललेल्या १००० स्वारांना पांच पांच घोड्यांची पर-
"वानगीही वचनाप्रमाणें मिळाली पाहिजे.

"१०.—तीन कोटी दाम[१], ह्मणजे, दोन कोटी दाम तहनाम्यांत कबूल केल्याप्रमाणें व एक
"कोटी दाम दक्षिणेतील फौजेच्या पगाराबद्दल, असे इनाम आपण मला द्यावयाचें; पैकीं दोन
"कोटींची मला आतांच्या आतांच जरूर आहे व त्याबद्दल सिरोही प्रांत देण्याचें बादशाहांनीं कबूल
"केल्याप्रमाणें तो माझे ताब्यांत द्यावा.

"११.—आणखी मला ईडर, केकी, मांडेल, जिहाजपुर, मालपूर, व दुसरा एक[२] असे महाल
"जास्त मिळावे.

---

१. चाळीस दामांचा एक रुपया. यावरून, वरील तीन कोटींचें इनाम ह्मणजे साडेसात लाख रुपये होतात.

२. त्याचें नांव शाई उडून गेल्यामुळें वाचावयास येत नाहीं.

स्वातंत्र्य, त्याचा जात्यभिमान आणि त्याची करारी हीं, बादशाहानें दिलेल्या उसन्या मोठेपणानें व बादशाहाचें अंकित होऊन राहण्यानें आपल्या अंगीं येत नाहींत, हें अजितसिंगासारखे लोक समजत नव्हते, असें वाटतें. अजितसिंगाप्रमाणेंच आणखी कित्येक लब्धप्रतिष्ठ रजपूत संस्थानिक बादशाहाला मिळाले, व बादशाहानेंही मेवाड वगैरे बलिष्ठ रजपूत राजांचा वचक बाळगून, त्या फितूरी रजपुतांस आपल्या आश्रयास ठेवून घेतलें; तथापि, दिवसेंदिवस बादशाहीचा बोज आणि शक्ति क्षीण होत चाललीं होतीं, तीं कांहीं पुढें सांवरलीं नाहींत.

अजितसिंगानें यद्यपि आपल्या जातीस बट्टा लावण्यासारखें आपल्या बरोबरीच्या दोघां मित्रांशीं विश्वासघाताचें वर्तन केलें व झालेला राजत्रयाचा तहनामा मोडला; तथापि, ती वेळ उमजून, राण्यानें बादशाहाशीं केलेल्या नवीन तहनाम्यांत, हिंदुलोकांच्या धार्मिक स्वातंत्र्याविषयींच्या व डोईपट्टी सोडविण्याविषयींच्या ज्या अटी घातल्या, तेणेंकरून, हिंदुलोकांवरचा एकंदर जुलूम कमी झाला. हा त्या वाईट कृत्यांत फायदा झाला असें ह्मणावें लागतें. व हें सर्व, वर लिहिल्याप्रमाणें, बादशाहीच्या निर्बलत्वानें आणि अशक्तपणानें झालें. दिवसेंदिवस बादशाहीला उतरती कळा लागली; व रजपुतांचा वरचढपणा हिंदुस्थानांत विशेष दिसूं लागला. दक्षिणेकडे मराठ्यांचा अम्मल वाढून, त्यांचा शाहूराजा सातान्यास राज्य करूं लागला. मराठ्यांनीं, काबीज केलेल्या मुलखांत चौथाई व सरदेशमुखी या नांवाचे कर चालू केले; आणि, याचप्रमाणें, तिकडे चमेलनदीचे कांठीं जाट नांवाचे लोक उठून, त्यांणींही आपलें स्वतंत्र राज्य स्थापन करून, बादशाहीला प्रतिबद्धक असें मुलूखगिरीचें काम चालविलें. राण्यानें केलेल्या वरील तहांत सिन्सिनी येथील विजयाचा जो संबंध आला आहे त्या जयानंतर पुढें कांहीं दिवसांनीं भरतपूर येथें दंगा झाला. तो दंगा या जाट लोकांनींच करून भरतपूर शहर काबीज केलें; व तीच त्यांणीं आपली राजधानी केली.

राणा उमरावसिंग याचे कारकीर्दींत वरील तहाचें कृत्यच शेवटचें होतें. ह्मणजे, ह्या तहापेक्षां विशेष महत्वाचें असें कृत्य कांहीं पुढें घडलें नाहीं. राणा उमराव हा इ० स० १७१६ मध्यें मरण पावला. या राण्यानें आपले पश्चात् आपली चांगली कीर्ति व नांव राखिलें. तो मोठा चपल, स्वकार्यदक्ष आणि थोर मनाचा होता. त्यानें आपला देश ऊर्जितावस्थेस आणण्याचा होईल तितका प्रयत्न करून, त्यानें आपला अभिमान व आपलें वजन हीं अखेरपर्यंत पूर्णपणें राखिलीं. त्या वेळीं चोहोंकडे बलबलपुरी फार माजली होती. तथापि, राणा उमरावसिंग यानें आपल्या राष्ट्राचा बोज उत्तम रीतीनें कायम ठेविला. यावरून तो चांगला राज्यकुशल होता, यांत संशय नाहीं. त्यानें

शेतकीला विशेष उत्तेजन देऊन, कित्येक कलाकौशल्याच्या कारखान्यांचें उत्तमरीतीनें संरक्षण केलें. त्याच्या वेळचे कित्येक कोरींव स्तंभ आहेत, त्यांवरून त्या वेळच्या कौशल्याचें चांगलें दर्शन होतें. राणा उमरावसिंगाचे कारकीर्दीस रजपूत भाट फार चांगलें मानतात, व त्याच्या नांवाला सन्मान देतात. मेवाडचें राज्य, राणा उमरावसिंग याचे मागून बसलेल्या राजपुत्राचे कारकीर्दीपर्यंत कांहीं कोणत्याही अंशांनीं खालावलें नव्हतें, असें रजपूत समजतात. राणा उमरावसिंग याचे मागून संग्रामसिंग हा मेवाडचा राणा झाला.

# भाग तेरावा.

## राणा संग्रामसिंग.

राणा संग्रामसिंग.—मोंगलबादशाहीतील अव्यवस्था.—दक्षिण हैदराबाद येथें निजाम-उल्-मुल्क याजकडून राज्यस्थापन.—फिरोखशीर बादशाहाचा खून.—डोईपट्टीच्या कराचें उच्चाटन.—दिल्लीस महंमदशाह बादशाहाचें तख्तारोहण.—सादतखान अयोध्या घेतो.—डोईपट्टीच्या कराचें पुन: स्थापन.—मेवाडची कारकीर्द.—राणा संग्रामसिंगाचा मृत्यु.—त्याचे कारकीर्दीतल्या कांहीं गोष्टी.—दुसरा जगत्सिंग राणा मेवाडच्या गादीवर बसतो.—मेवाड, मारवाड आणि अजमीर येथील राजांचा तह.—मराठ्यांचा हिंदुस्थानांत प्रवेश व त्यांचें माळवा व गुजराथ या प्रांतांत राज्यस्थापन.—नादिरशाहाची हिंदुस्थानावर स्वारी.—दिल्ली येथील लूट.—राजपुतान्याची स्थिति.—मेवाडची हद्द.—रजपूत राजांचे तहनामे आणि मित्रत्व.—मेवाडावर बाजीराव पेशव्याची स्वारी.—त्याचा वार्षिक खंडणी घेण्याचा ठराव.—अजमीरच्या गादीवर माधवसिंगाला बसविण्याविषयीं वाद.—राजमहाल येथील लढाई.—राण्याचा पराजय.—मल्हारराव होळकराबरोबर त्याचा एकोपा.—अजमीरचा राजा इसरीसिंग (ईश्वरीसिंह) याचा विषप्राशनानें आत्मघात.—राण्याचा मृत्यु.—त्याचें गुणस्वभाववर्णन.

उदेपुरच्या गादीवर संग्रामसिंग हा राणा झाला. या नांवाचाच एक राणा पूर्वी होऊन गेला असून, मोंगलांशीं त्याचें कट्टें वैर होतें. मोंगल बादशाहींतील अखेरचा राजपुरुष, ज्यापुढें हिंदुस्थानांत पुन: बादशाह ह्मणून झाला नाहीं, असा जो महंमदशाह तो आणि राणा संग्रामसिंग हे सरासरी बरोबरच, आपआपल्या राज्यावर आले. राणा संग्रामसिंगाची कारकीर्द इ० स० १७१६ पासून इ० स० १७३४ पर्यंत होती. तितक्या काळांत दिल्लीच्या बादशाहीमध्यें अत्यंत अव्यवस्था होऊन, मोंगल राज्याचे अगदीं तुकडे तुकडे झाले ! जिकडे तिकडे स्वतंत्र राजे होऊन, कोणीच कोणाचा ताबेदार नाहीं, असें होऊन गेलें. ह्यामध्यें मुसलमान, मराठे व रजपूत ह्या तिन्ही जातींतील राजे आपापला कारभार स्वतंत्रपणेंच पाहूं लागले. ह्याप्रमाणें, मुख्य बादशाही वृक्ष तुटला जाऊन, त्यापासून अनेक लहान लहान राज्यरूप निरनिराळीं रोपें व कोम फुटून, त्यांचें एक मोठें थोरलें झांपच झालें. हिंदुस्थानतां

सार्वभौम राजा कोणीच नाहींसा होऊन, जो तो आपल्यास स्वतंत्र ह्मणवूं लागला. परंतु ही स्थितिही फार दिवस टिकली नाहीं. जो तो आपण स्वतंत्र, आपण स्वतंत्र, असें ह्मणतां ह्मणतां, सर्वजण एका शतकाचे आंतच, एका अगदीं दूरच्या देशाचे लोकांच्या ताब्यांत जाऊन पडले ! हे अतिदूरदेशचे लोक कोण ? हें कांहीं वेगळें सांगावयास नकोच. इंग्रजांनीं अल्पावकाशांत आणि युक्तियुक्तीनें हा सर्व देश आपल्या स्वाधीन करून घेतला. बंगाल्यांतील सर्व राज्यें बुडून गेलीं; आणि अयोध्या व दक्षिण हैदराबाद येथील राज्यें अगदीं जर्जर झालीं. तीं राज्यें मूळचीं तरी चांगल्या मार्गानें स्थापन झालीं होतीं असें नाहींच. कोणीं बंडें आणि पुंडावीं करून राज्यें स्थापन केलीं; कोणी आपल्या धन्यांशींच कृतघ्न होऊन व त्यांजवर उठून आणि त्यांचीं राज्यें किंवा राज्यभाग बळकावून आपणच राजे झाले होते. मराठ्यांचे राज्याची गोष्ट अगदींच वेगळी होती. त्यांचें साहस व उत्साह हीं कांहीं विलक्षणच होतीं. ते स्वतः निरक्षर व अगदीं नांगऱ्ये असतां, त्यांनीं मोठमोठीं राज्यें कमाविलीं, ही गोष्ट फारच आश्चर्य करण्यासारखी आहे ! त्यांचीं मूळचीं हत्यारें ह्मणजे केवळ विळे व कोयते असतां, ते पुढें मोठे तरवारबहाद्दर असे शूर व लढवय्ये बनले. ते नांगर चालविणारे, किंवा कोठें चावडीवर बसून अडाणीपणाचें पाटिलकीचें वतन हांकणारे अथवा चौघुले असे केवळ हलके ग्रामाधिकारी लोक असतांना, त्यांच्यांतूनच मोठमोठे रणवीर, सरदार, सुभेदार, व किल्लेदार किंवा पागेदार निघाले. त्यांच्यांत धनगर ह्मणजे शेळ्या मेंढ्या हांकणारे व गुरें वळणारे कुणबी लोक असून ते राजे झाले; आणि कुळकर्णी व भटभिक्षुक असे जे ब्राह्मण ते मोठे शहाणे कारभारी, फडणीस, वकील व मुत्सद्दी बनले. ही सर्व फेरबदल केवळ काळानें आणि त्या वेळच्या अतिशय जुलमानें झाली, असें त्या काळचा इतिहास लक्ष्यपूर्वक वाचला ह्मणजे समजून येतें. हे सर्व स्वपराक्रमी लोक स्वार्थ सोडून परस्परांशीं जरा मिळून मिसळून वागते व रयतेच्या हितावर व स्वास्थ्यावर नजर देऊन त्याप्रमाणें आपला वर्तनक्रम ठेवते, तर, त्यांस जें जन्मादारभ्य हें महान् वैभव व स्वातंत्र्य मिळालें होतें तें, बहुत काळपर्यंत अबाधित आणि अप्रतिबद्ध टिकून, त्यांचें राज्यमंदिर ढांसळून त्याची माती होतीना. मराठी राज्याचा मूळ संस्थापक शिवाजीमहाराज यानें, प्रथमतः, औरंगजेब बादशाहाचे कबजांतून मुलूख हिसकून घेऊन आपलें राज्य स्थापन केलें. त्या राज्याचेंच पुढें नीट रीतीनें रक्षण झालें असतें व शिवाजीमहाराजांचे पुढील राज्यकर्त्यांमध्यें शिवाजीमहाराजांप्रमाणेंच सभ्यता, साधेपणा, प्रजाहिततत्परता आणि अनुन्माद हीं राहिलीं असतीं, तर मराठी राज्यासारखें खंबीर व भक्कम राज्य हिंदुस्थानांत दुसरें कोणतेंही झालें नसतें. परंतु तसें झालें नाहीं. त्यांच्यांतील प्रत्येकाला

स्वार्थबुद्धि उत्पन्न होऊन, चक्रवर्तीराज्यस्थापनेचा मूळचा हेतु एकीकडेच राहिला; व प्रारब्धवशेंकरून जो राज्ययोग आला होता त्याला मोठा धक्का बसला. राज्यकर्ते व राज्याधिकारी उन्मत्त, मत्सरी व नीच बुद्धीचे होत जाऊन, त्यांनीं आपला नाश करून घेतला. अशा प्रकारचें उदाहरण जगाचे इतिहासांत येवढेंच आहे असें नाहीं. जगाचा इतिहास आपल्याला अशा प्रकारच्या पतनोन्नति शतशः दाखवितो व सांगतो. मनुष्याला अधिकारवैभव प्राप्त झाल्यानंतर त्याची पूर्वस्थिति कायम राहून, तिचें त्याला स्मरण राहील, अशी गोष्ट होणें असंभाव्यच आहे. व त्या असंभाव्यतेमुळेंच हे असे पुढील अहिताचे व खेदकारक परिणाम घडलेले आपण पाहतों! मराठ्यांचा इतिहास पाहिला असतां, मनुष्यस्वभावांत अधिकारवैभवाचे संबंधानें कसकसे फेरफार होतात, हें स्पष्टपणें कळून येण्यासारखें आहे. त्यांच्यांमध्यें पहिल्यानें जो उत्साह आणि अद्भुत किंवा शक्तिबाह्य कृत्यें करण्याची प्रवृत्ति होती, ती पुढें पुढें नष्ट होऊन, ते केवळ चैनी व सुखोपभोगी बनले. त्यांचें पहिलें औदार्य, न्यायानुवर्तित्व आणि शौर्यभक्ति हीं नष्टप्राय होऊन, ते अत्यंत कृपण, लुटारू व भ्याड असे होत चालले. ते अल्पसंतुष्ट राहून, महाराष्ट्रांतल्या महाराष्ट्रांतच जर आपलें राज्य दृढ करून असते, तर कदाचित् त्यांचें राज्य जितके दिवस टिकलें त्याचेपेक्षां ज्यास्त दिवस टिकलें असतें. परंतु, मनुष्याची महत्वाकांक्षा फार मोठी असल्यामुळें, त्याचे पोटीं जीं संकटें व आपत्ति येतात तीं पुढें त्याला निमूटपणें भोगावीं लागतात, हा सृष्टिक्रमच आहे. व, त्याप्रमाणेंच, मराठ्यांनाही पुढें त्यांच्या फाजील महत्वाकांक्षेचें कटू फळ मिळालें; त्यांत कांहीं अपूर्व असें घडलें नाहींच. त्यांनीं आपला अम्मल दक्षिणेकडे बसविल्यानंतर उत्तरेकडे रोख फिरविला, व तिकडील राज्यें व संस्थानें काबीज करण्यास सुरुवात केली. मराठी राज्याचा उदय केवळ परधर्मी जे मोंगल बादशाह त्यांच्या जुलमामुळें झाला; हीच गोष्ट मूळाशीं असलेली दिसेल. तेव्हां, अशा प्रसंगीं ह्मटलें ह्मणजे मराठ्यांनीं आपल्या हिंदुधर्माचे जेवढे लोक असतील तेवढ्यांशीं मिळून मिसळून, त्या विधर्मी बादशाहीच्यामागें लागावयाचें होतें, हा मुख्य पक्ष. परंतु तसें कांहीं न करितां, उत्तरेकडे गेल्यावर, तिकडील रजपूत राजे जरी त्यांचे देशबंधु व एक धर्माचे होते, तरी, त्यांसही पादाक्रांत करण्याच्या मसलती त्यांनीं केल्या; व त्यांशीं झुंजण्यांत त्यांनीं आपल्या शौर्याचा व उत्साहाचा व्यर्थ व्यय केला, असें ह्मणावें लागतें. रजपूत आणि मराठे हे दोघेही एक धर्माचे व एकाच देशांतील असून, त्यांनीं उभयतांनीं जर एकवाक्यतेनें आपली हिंदुपदबादशाही स्थापण्याचें मनांत आणिलें असतें तर, त्यांचा तो हेतु सहज सिद्धीस जाण्यासारखा तो काळ होता, यांत संशय नाहीं. मोंगल बादशाहीचें उत्पाटन करण्याकडे रजपूत राजांचें लक्ष्य

फार लागलें असून, त्यांत मेवाडचे राणे हे अगदीं अग्रेसर होते. इतके दिवस हिंदुलोकांनीं परधर्मी राजांचे अमलांत आपले दिवस काढून, तज्जन्य अनेक अपमान व दुःखें सोशिलीं, त्या सर्वांचें उट्टें काढण्यास व आपल्या देशचें राज्य आपण परत घेण्यास हा काळ फार चांगला होता. परंतु, मराठ्यांना जात्यभिमान व देशाभिमान असावा तसा नसल्यामुळें, त्यांना त्या सुसंधीचा फायदा करून घेतां आला नाहीं! दुसऱ्या प्रांतांतील लोक ह्मणजे ते परकीय लोक, अशी त्यांची समजूत असे; व त्यामुळें रजपुतांशीं ते कधींच एकदिल झाले नाहींत. आपलें बळ कसें वाढवावें व आपल्या देशांतील लोकांस असें अनुकूळ करून घ्यावें, हें त्यांस स्वधर्मबंधुप्रीति नसल्यामुळें, मुळींच सुचलें नाहीं. इतकेंच नव्हे; तर, जे एकत्र होते त्यांच्यांमध्येंही परस्परांविषयीं मत्सर उत्पन्न होऊन, पुढें फुटाफूट आणि फाटाफाट झाली, व त्यांच्याही राज्याचा अखेरीस नायनाट झाला! ही सर्व हकीकत यापुढें हळू हळू वाचकांस कळेलच. सारांश, दिल्लीच्या बादशाहीवर रजपुतांशिवाय मराठे हे उठले खरे; परंतु त्यांच्या राज्याला चांगलें नांव मिळून, त्या राज्यामध्यें लोकांची आबादानी व व्यापारव्यवहाराची सुयंत्रता वगैरे ज्या गोष्टी होणें अवश्य होत्या त्या होण्यास अवकाशच झाला नाहीं; व, इतक्यांत, भलतेच लोक येऊन, त्यांच्या हातांत त्यांची सर्व सत्ता व सर्व अधिकार अचूक जाऊन पडल्यामुळें, हिंदुपदबादशाहीची कल्पना कोणास सुचते न सुचते तों त्या कल्पनेचाच अंकुर मूळाशीं खुडला गेला! असो.

फिरोखशीर बादशाहाचें रजपुतानीबरोबर लग्न झाल्यामुळें त्याला एकप्रकारें रजपुतांचा पाठिंबा होता, व त्यानें आपल्यावरील सय्यदबांधवांचें वजन कमी करण्याकरितां, पूर्वभागांत सांगितल्याप्रमाणें, इनायत-उल्ला यास आपला वजीर केलें. परंतु त्या वजीरानें जेजिया (डोईपट्टी) कर बसविल्यामुळें, रजपुत लोक मात्क्यान् बिथरून जाऊन, त्यांनीं त्याचा पक्ष सोडल्यासारखेंच केलें. बादशाहाच्या राणीचा बाप राजा अजितसिंग राठोड यानें जेव्हां बघितलें कीं, बादशाह हा आपलें कांहीं न ऐकतां, वजीराचे दुष्ट मसलतीप्रमाणेंच चालतो; तेव्हां, त्यानेंही त्याचे बद्दलचा अभिमान सोडला. याच वेळीं, पुढें ज्याणें दक्षिणेकडे हैदराबादेस आपलें स्वतंत्र राज्य स्थापन केलें, तो निजाम-उल्-मुल्क, हा मुरादाबाद येथें सुभेदार होता; त्याला सय्यदांनीं दिल्लीस बोलावून आणून, माळव्याचा अधिकार देण्याचें त्यास अभिवचन दिलें; व त्याच्या साह्यास दहाहजार मराठ्यांची कुमक देऊन, त्यास एकदम बादशाहाचे वाड्यावर पाठविलें. त्या वेळीं मराठे हे अतिशय प्रबल असल्यामुळें ते वाटेल त्यास राज्यावरून काढून, त्यांच्या मर्जीस येईल त्याला गादीवर बसविण्यास समर्थ होते. त्यांनीं राजवाड्याला वेढा घालून, बाहेर, फिरोखशीर बाद-

शाहाला पदच्युत केलें, म्हणून द्वाही फिरविली. फिरोखशीर याला कोणाचाच आश्रय व पाठिंबा नाहींसारखा झाला. तरी, त्याचे वाली व साह्यकर्ते असे अंबेर व बुंदी येथील ठाकूर होते. त्यांच्या मसलतीनें व मदतीनें बादशाह धीरानें समरांत उभा राहिला असता, तर त्यांचेही मनांत बादशाहाचे पक्षानें सय्यद, निजाम-उल्-मुल्क व मराठे यांचा समाचार घ्यावयाचें फार होतें. परंतु, तो स्वतः अत्यंत भीरू व अविश्वासी असल्यामुळें, त्यानें आपल्या राजमहालाचे बाहेर पडण्याचेंच मुळीं नाकारून, आपल्या साह्यकर्त्यांची भेटही घेतली नाहीं, व मसलतही ऐकिली नाहीं. आणि, केवळ, आपले दुस्मान काय करतील ते करोत असें म्हणून, त्यानें आपल्याला आपल्या शत्रूंचे स्वाधीन केलें. तेव्हां त्यांनींही त्याचे पक्षपती रजपूत लोकांस त्याज-कडून घालवून देऊन, त्याचे समाधानाकरितां, निजाम-उल-मुल्क यानें सन्मानद-र्शक असे कांहीं राजसंरक्षक लोक बादशाहाकडे राजवाड्यांत पाठवून दिले.

फिरोखशीर हा आपल्या राजवाड्यांतील जनानखान्यांत बसला असून, त्या ठिकाणीं आपलें चांगलें संरक्षण होईल असें त्यास वाटत होतें; परंतु, त्याही आश्रयस्थानीं त्याचें संरक्षण झालें नाहीं. या संबंधानें आह्मी मोंगल इतिहासलेखकाचेंच ह्मणणें येथें उतरून घेतों:—"रात्र झाली, आणि त्या हतभागी बादशाहाचा दिनग्रह अस्तंगत होऊन, काळाकुट्ट अंधार पडला. राजवाड्यांत फक्त वजीर व अजितसिंग यांस राहूं देऊन, बाकीचे बादशाहाचे स्नेही व अभिमानी सर्व वाड्याबाहेर ठेवले; आणि वाड्याचे दरवाजे बंद केले. ही रात्र ह्मणजे शहरांतल्या लोकांना अत्यंत भयंकर वाटली. राजवाड्यांत काय चाललें आहे, याची बातमी कोणासच कळेना, व ती कळण्याला मार्गही नव्हता. अमीर-उल्-उमराव हा आपले स्वार आणि मराठ्यांचे दहाहजार लोक घेऊन व शस्त्रें परजाळून राजवाड्याला गराडा घालून उभा होता. पहाट झाली, आणि बादशाही नौबतीचा मोठा ध्वनि होऊन, त्या योगानें फिरोख-शीर हा पदच्युत झाल्याचें व रफे-उल्-दिर्जात ह्यास तख्तावर बसविल्याचें वर्तमान शहरांत जाहीर झालें." झालें; फिरोखशीर याची पदच्युति आणि रफे-उल्-दिर्जात याचें तख्तारोहण यांच्यामध्यें जो अल्पावकाश गेला, त्यामध्येंच त्या बिचाऱ्या नामधारी पूर्वदेशीय बादशाहाचा अवतार संपला; आणि चोबदाराकडून खेळांतल्या बाहुल्या-प्रमाणें बनलेल्या त्या नवीन राजाच्या संबंधानें 'बादशाहांचा जयजयकार असो!' अशी आरोळी होण्यापूर्वींच फिरोखशीर याचे मानेभोंवतीं धनुर्ज्या (कातड्याची तांत) पडून तो मृत्यूला बलि पडला!

ह्याप्रमाणें फिरोखशीर बादशाहाचा अंत होऊन दिल्लीच्या तख्तावर नवीन बा-दशाह आला. ही गोष्ट इ० स० १७१९ या वर्षीं घडली. फिरोखशीर याचा

सासरा अजितसिंग हा दिल्लीच्या दरबारांत होताच, व त्याचें नवीन बादशाहावर वजन असे; असें दिसतें. कारण, ह्या नव्या बादशाहानें अजितसिंगाला संतोष व्हावा ह्मणून, पूर्वीच्या बादशाहानें जो डोईपट्टीचा कर बसविला होता तो उठविला. सय्यदांचेही मनांतून रजपूत लोकांस खुष ठेवून, त्यांना आपल्याला अनुकूल करून घ्यावयाचें होतें; व ह्मणून, त्यांनीं राजा रतनचंद (रत्नचंद्र) यास बादशाहाची वजीरात (दिवाणगिरी) दिली, आणि पूर्वीचा वजीर इनायत-उल्ला यास काढून टाकिलें. पुढें थोडेच दिवसांत एकामागून एक असे तीन बादशाह झाले; व इ० स० १७२० या वर्षी, बहादुरशाहाचा वडील मुलगा रोशन-अख्तर यास 'महंमदशाह' हें नांव देऊन गादीवर बसविलें. ह्या महंमदशाहानें नांवाला तीस वर्षें राज्य केलें. परंतु त्या राज्य करण्यांत अर्थ काय होता ! त्या मुदतींत दिल्लीची बादशाही पूर्णपणें उद्ध्वस्त होऊन तिचे तुकडे तुकडे झाले ! दक्षिणेकडून मराठे आणि पश्चिमेकडून अफगाण देशचे पठाण यांनीं दिल्लीची संपत्ति लुटण्याचा सपाटा चालविला. सय्यदांचे व दिल्लीचे दरबारांतील कित्येक डोईजड सरदारांचें वांकडें पडून, त्यांचे आपसांत तंटे माजले. त्यांत विशेषेंकरून सय्यद हे निजामाशीं फार बांकून वागूं लागले. निजाम हा मोठा बुद्धिमान् होता; हें, तो ज्या माळवा प्रांतावर सुभेदार होता तेथें त्यानें जी सुधारणा व व्यवस्था करून तो प्रांत भरभराटीला आणिला, त्यावरूनच दिसत होतें. परंतु हें सय्यदांना विषम वाटूं लागलें. राजनिंदेच्या संबंधानें तर कोणास कल्पना देखील येण्याची भीति नव्हती. कारण, राजनिष्ठा ही, स्वत: राज्यकर्ता पुरुष तसाच वजनदार व स्वतंत्र असेल तर लोकांनीं बाळगावयाची. दिल्लीचा बादशाह ह्मणजे दरबारच्या मंडळीनें नांवाला एक बाहुलें करून ठेविलें होतें. तेव्हां, त्या बाहुल्याबद्दलची राजनिष्ठा किंवा त्याचे संबंधानें वचक बाळगणें, ह्या दोन्ही गोष्टी असंभाव्यच होत्या. सय्यदांना वाटे, 'आपण सरदारांवर आपलें वजन बसवावें;' सरदार ह्मणत, 'हा कोण आमचेवर वजन बसविणार ?' आणि, अशा चुरशीनें, दिल्लीचे दरबारांतच जिकडे तिकडे दुफळी माजली. निजाम हा आपल्याला स्वतंत्र ह्मणवूं लागला; व तो असीर आणि बऱ्हाणपूर येथील किल्ले आपल्या ताब्यांत घेऊन विशेष जोरवान् झाला. असें जेव्हां झालें तेव्हां सय्यदांना उघड निजामाचा पराभव करण्यास उठण्याला कारण झालें. त्यांनीं आपल्या मदतीला रजपूत राजांस बोलाविलें. तेव्हां[1] कोटा व नरवर

---

१. ह्या हकीकतीच्या संबंधानें अंबेरचा राजा जयसिंग यानें राणा संग्रामसिंग याचा प्रधान बिहारीदास याला एक पत्र पाठविलेलें उदेपूरच्या दफ्तरांत मिळालें आहे. तें पुढें लिहिल्याप्रमाणें:— "अमीर-उल्-उमराव हा दाखल होऊन, बाळाजी बाजीराव पंडित पेशवा याचे मार्फत माझी ह्याची भेट होण्याचें ठरलें. ह्या भेटींत त्यानें मला कळविलें कीं, 'तुमचे विषयीं माझ्या मनांत स्नेहभाव असल्या-

येथील राजे सय्यदांचे आमंत्रणाप्रमाणें त्यांस मदतीला आले; व ते तसेच नर्मदेकडे

मुळें तुह्मी या वेळीं येथून निघून जावें हें बरें.' याचप्रमाणें किसनसिंग आणि जीवालाल यांनींहीं मला निघून जाण्याविषयीं सांगितलें. परंतु येवढ्यावरूनच मी बादशाहाचा पक्ष सोडून जाणें मला बरोबर न दिसून, खुद्द त्याचें अवसान व इच्छा कशीं काय आहेत तीं कळावीं ह्मणून, मी बादशाहाकडे एक पत्र पाठवून, त्यांत, वरील मंडळी मला काय सांगते तें सर्व कळविलें. तरी शेवटीं मीं त्यास असेंही कळविलें कीं, 'तुमची इच्छा व दम जसा असेल तसें मला करावयाचें आहे.' परंतु त्याचा दम व अवसान कचें दिसून, त्यानें सांगितल्यावरून मीं माझा तळ दिल्लीहून हलविला; व पुढें शिरवळच्या धर्मशाळेजवळ तंबू ठोकून मुक्काम केला. मी दिल्लीहून बादशाहाचे निरोपाप्रमाणें निघालों तेव्हां रावराजा (बुंदीचा) यासही मीं सांगितलें कीं, 'तुह्मी माझे बरोबर चला, येथें थांबून बादशाहाचा अभिमान धरण्यांत अर्थ नाहीं.' परंतु तें त्यानें न ऐकतां तो कुतुब-उल्-मुल्क यास जाऊन मिळाला. तेव्हां कुतुब यानें आपल्याकडचे कांहीं स्वार त्याला देऊन, बादशाहाचे वतीनें तो अजितसिंगाबरोबर शत्रूपुढें तळ देऊन उभा राहिला. पुढें कोट्याचा राजा भीमसिंग याचें लष्कर येऊन पोहोंचलें. आणि नंतर लढाई झाली. तींत जयतसिंग हाडा हा मारला गेला; व रावराजा पळून जाऊन, अलिवर्दीखानसिराई नांवाच्या धर्मशाळेंत आश्रय धरून राहिला. तेव्हां मग त्याचे संरक्षणास मीं आपलें सैन्य त्याजकडे पाठवून, त्याला संकटमुक्त केलें. याप्रमाणें, ज्याला स्वतःचा दम नाहीं, त्याचा अभिमान धरून काय उपयोग? तिकडे बादशाहानें आपले हमामखाने (स्नानागारें) आणि जामदारखाने वगैरे चटू सारे सय्यदांचे स्वाधीन केले. तेव्हां त्यांची वाटेल ती व्यवस्था त्यांनीं लावली. तुह्माला सय्यदांचें वर्तन वगैरे सर्व माहित आहेच. मी आतां माझे देशाला परत जाण्याकरितां निघालों आहे. मला हुजूरास (राणेसाहेबांकडे) येऊन प्रत्यक्ष पुष्कळ गोष्टी सांगावयाच्या आहेत. त्यापूर्वी तुह्मी एकदां मजकडे येऊन मला भेटा. फाल्गुन शुद्ध ९, संवत् १७७५. (इ० स० १७१९)." वरील पत्रांत अंभेरचा राजा जयसिंग यानें बादशाह फिरोखशीर याचा भीरुपणा स्पष्ट कळविलाच आहे. त्याच पत्रांत त्यानें राण्याला जें सम्मानपूर्वक आणि श्रेष्ठाधिकारसूचक, 'हुजूरास येऊन पुष्कळ गोष्टी सांगावयाच्या आहेत,' असें ह्मटलें आहे, त्यावरून तो त्यास किती मानीत होता हेंही समजण्यासारखें आहे. राजा जयसिंग हा राण्याला किती मानीत होता याबद्दलचें दिग्दर्शन पुढें दिलेल्या एका पत्रावरून तर विशेषच होण्यासारखें आहे:—"सिद्ध श्री महाराजाधिराज श्री संग्रामसिंगजी यांचे चरणीं—सवाईजयसिंग याचे प्रणाम. इकडील कुशलवार्ता सर्व यथास्थित आहे. आपलें कुशल लेखन करीत जाणें. आपण श्रेष्ठ आहांत; तेव्हां, आपणा उभयतांचें हित एकच आहे. माझे स्वार, शिबंदी आणि सैन्य आपल्या सेवेस हजर आहे. जेव्हां जरूर लागेल तेव्हां मला आज्ञा व्हावी. महाराणेसाहेबांच्या मातोश्री (श्रीमती बायजीराज) यांचा दर्शनलाभ फार दिवसांत झाला नाहीं. आपली स्वारी जर इकडून गेली तर त्या वेळीं आईसाहेबांचीही स्वारी आपले बरोबर असेल अशी मी आशा करतों. विशेष हकीकत दीपचंद पंचोली हा सांगतां कळेल. आषाढ शुद्ध ६, संवत् १७७७. (इ० स० १७२१)."

२. अंभेरचा राजा जयसिंग यानें या वेळीं राण्याचा प्रधान बिहारीदास यास पुढें लिहिल्याप्रमाणें पत्र पाठविलें होतें:—"तुमचे राणेसाहेब घोडेस्वारांचे खर्चाकरितां पैसा पाठवीत आहेत, ह्म-

निजामाला अटकाव करण्यासाठीं पुढें चालते झाले. तिकडे त्यांची व निजामाची चकमक उडाली; व त्या चकमकींत कोट्याचा राजा मारला गेला. ह्याप्रमाणें निजामाची स्वतंत्रता कायम झाली. निजाम स्वतंत्र झाला तसा अयोध्येचा नवाबही स्वतंत्र होऊन, दिल्लीचे दरबारांतील ते दोघे सरदार बादशाहास उघडपणें जुमानीनासे झाले. त्या वेळीं दिल्लीच्या लष्करावर सादतखान हा मुख्य होता. परंतु तोही सय्यदांचे विरुद्ध मसलतींत शिरला; व सय्यदांच्या पक्षाचा जो अमीर-उल्-उमराव म्हणून सरदार होता त्याच्या मारेकऱ्यांपैकीं तो एक झाला. अमीर-उल्-उमराव याचे जवळ हैदरखान नांवाचा एक शूर मनुष्य होता. तो सादतखानास अनुकूल होऊन, निजामावर जेव्हां सय्यदांनीं अमीर-उल्-उमराव यास पाठविलें तेव्हां, सादतखान व हैदरखान हे दोघेही त्याचे बरोबर असल्यामुळें, त्यांना आपला बेत शेवटास नेतां आला; आणि हैदरखान यानें संधि साधून, अमीर-उल्-उमराव याचे उरांत कट्यार खुपसून त्यास मारून टाकिलें. ह्याप्रमाणें आपल्याला डोईजड झालेल्या सय्यदांचा एक शूर सरदार मेल्यामुळें बादशाहाला बरें वाटलें. इतक्यांत, पूर्वीचा वजीर इनायत-उल्ला हा बादशाहावर उठून, त्यानें आपला एक इब्राहिम नांवाचा सरदार बादशाहाविरुद्ध सैन्य देऊन पाठविला. या गडबडींत रजपुतांचा कांहीं एक संबंध नव्हता. ते तिऱ्हाइतासारखे अलग राहिले. इतक्यांत, बादशाहाचा रजपूत वजीर (दिवाण) राजा रत्नचंद्र यास धरून त्याचा वजीर इनायत-उल्ला यानें शिरच्छेद केला; व त्यावरून उघड लढाई सुरू होण्याचीं चिन्हें दिसूं लागलीं. तेव्हां, दिल्लीचा सेनापति सादतखान यानें आपली फौज सज्ज करून, वजीर इनायत-उल्ला याचेवर पाठविली, व त्यास पकडून तावडतोब फांशीं दिलें; आणि, हिंदु वजीर राजा रत्नचंद्र दिवाणबहादर याचा जो त्यानें दुष्टावा करून घात केला होता, त्याबद्दलचा सूड उगविला. ह्याप्रमाणें, सादतखान यानें बादशाहाचें स्वातंत्र्य व वजन कायम राखण्याचा होईल तितका प्रयत्न चालविला. सादतखान याचे ह्या राजनिष्ठादर्शक कर्तव्यावरून बादशाहानें त्यास 'बहादूरजंग' ही पदवी दिली व त्याजकडे अयोध्या प्रांताची सुभेदारी सांगितली. सादतखान विजयी झाल्या-

---

णून तुह्मीं मला कळविलें; त्याविषयींची पुढें हकीकत समजली नाहीं. आतां सदरील पैसा एकदम उंटांवर घालून तावडतोब पाठवावा. उशीर होऊं नये. नवाब निजाम-उल्-मुल्क उज्जनीहून निघून त्वरेनें कूच करीत आहे. व जबीलाराम इकडे येत आहे. आम्याहून जी बातमी आली आहे तीवरून समजतें कीं, तो काल्पीच्या पुढें देखील आला आहे. ही दिवाणाची फौज लौकर येऊन मिळाली तर बरें होईल. याकरितां जलदी करा. पैसा जर वेळेवर येऊन पोहोंचेल तर सामग्रींत लष्कराचा सर्व पुरवठा आहे. पैसा जवळ असला ह्मणजे सर्व कांहीं सोयी होतात. भाद्रपद-शुद्ध ४, संवत् १७७६. (इ० स० १७२०)."

मुळें रजपुतांस समाधान वाटलें, व ते त्याचा सन्मान करूं लागले. आजपर्यंत रजपूत राजांनीं ह्या बादशाहींतल्या गडबडींत आणि उलाढालींत आपलें अंग मुळींच न दाखवितां, ते अगदीं तिऱ्हाइतांसारखे राहिले होते, हें वर सांगितलेंच आहे. हा त्यांचा निरुपाधिकपणा बघून, दिल्लीच्या बादशाहानें अंभेरचा राजा जयसिंग आणि जोधपूरचा राजा अजितसिंग यांस अनुक्रमें आग्रा व गुजराथ-अजमीर या प्रांतांचे अधिकार दिले. पैकीं अजमीरच्या किल्ल्यांत अजितसिंग हा जाऊन राहिला. दिल्लीस मारला गेलेला हिंदू वजीर दिवाणबहादर राजा रत्नसिंह याचा मुख्य चिटणीस जबीलाराम ह्मणून होता, त्याचा मुलगा गिरिधरदास नागर याजकडे माळवा प्रांताची सुभेदारी देऊन, त्याला मराठ्यांस अडथळा करण्यासाठीं माळव्याचे सरहद्दीवर पाठविलें; आणि दक्षिण हैदराबाद येथें राज्य करीत असलेल्या निजामास बोलावणें पाठवून त्याला दिल्लीची वजीरात दिली. अशी व्यवस्था केली[१]

दिल्लीस ज्या ह्या गडबडी व धामधुमी झाल्या त्यांमध्यें मेवाडच्या राण्याचें कांहीं कल्याण झालें नाहीं व तो त्या गडबडींत व धामधुमींत मुळींच पडला नाहीं. परंतु त्याचे शेजारी, अंभेर आणि मारवाड येथील राजे, यांनीं आपलें कल्याण करून घेतलें. अंभेरच्या राजानें आपली सरहद्द यमुनानदीपर्यंत वाढविली; आणि मारवाडच्या राजानें अजमीरपर्यंत आपला अंमल नेऊन, तिकडे गुजराथ प्रांताचीही वाता-

---

१. नागोरचा राजा बखतसिंग यानें राण्याचा प्रधान बिहारीदास याला पुढें लिहिल्याप्रमाणें पत्र लिहिलें होतें:—"तुमचें पत्र पावलें, व त्यांतील मजकूर वाचून आनंद झाला. श्री दिवाण साहेबांचीही चिठ्ठी मला पोंचली व त्यांतील मतलब कळला.' तुह्मी मला कळवितां कीं, दोघेही सय्यद नबाब रणांगणीं आले आहेत व दोघेही महाराज (कोटा व नरवर येथील) त्यांना मिळाले असून तुमचीही फौज त्यांचे मदतीला जाणार आहे. परंतु ह्या कामांत जुनें मित्रत्व कसें तोडवलें? ह्या तुमच्या एकमेकांच्या समजुती झाल्या खऱ्या; परंतु ह्या तयारींत मला कांहीं अर्थ दिसत नाहीं. कारण, सय्यद हे समरांत येणार नाहींत. व त्यांचे साह्यकर्ते वरील महाराजही दक्षिणेकडे जाणार नाहींत. ते सर्व चैनीनें घरीं बसून मोठमोठ्या शौर्याच्या गोष्टी बोलतील, ह्यापेक्षां त्यांच्याकडून जास्त कांहीं व्हावयाचें नाहीं. परंतु कांहीं आकस्मिक कारणानें सय्यद नबाब समरांगणीं आले, तरी, ते आपल्या कार्यावरच काय तें लक्ष्य देतील. तुह्मी कोणाचा पक्ष धरून न राहिलांत तर तुमचा मात्र नाश होईल. ह्याबद्दल तुह्मीं अगोदर विचार करावा हें बरें. तुह्मी आपला मार्ग बिनधोक आहे असें बघून मग पुढें पाऊल टाका. आपले हिताकरितां कोणताही पराक्रम करण्यास जर आपलें स्वतःचें सामर्थ्य असेल तर त्यामध्यें दुसऱ्याला काय ह्मणून यश घेऊं द्यावें? तुह्मी सुज्ञ आहांतच व तुह्माला भवितव्य काय आहे तें अगोदर समजतें. जेथें तुमच्यासारखे प्रामाणिक आणि स्वामिभक्तैकनिष्ठ नौकर लोक आहेत, त्याठिकाणीं धोका किंवा भीति असावयाची नाहीं, हें आह्मी जाणून आहोंत."

इत केली ! रजपूत भाटांनीं आपले ग्रंथांत असें वर्णन केलें आहे कीं, मारवाडचा अंमल "जगाच्या शेवटापर्यंत"[1] झाला ! परंतु, मेवाडची जी पूर्वीची हद्द होती तिजपेक्षां पुढें सरकण्याची महत्वाकांक्षा राण्यानें मुळींच ठेविली नाहीं. अबू, ईडर व डोंगरपूर आणि बांसवाडा, येथपर्यंत काय ती मेवाडची हद्द होती. राण्यानें असें निरपेक्षत्वाचें वर्तन ठेवण्याचें कारण पाहिलें असतां इतकेंच होतें कीं, आपण दिल्लीच्या खटपटींत व गडबडींत पडलो तर आपल्या राज्याची वृद्धि होईल खरी; परंतु त्यामुळें आपण बादशाहाचे ओशाळे होऊन, दुसऱ्या रजपूत राजांप्रमाणें आपल्यालाही आपल्या मुली बादशाहाला द्याव्या लागतील. तेव्हां, राज्यलोभानें आपल्या निष्कलंक व बाणेदार राजकुलास असा भिंधेपणा आणि कालिमा लावून घेण्यापेक्षां, आहे त्यामध्येंच संतुष्ट असणें हेंच हितकर व श्रेयस्कर आहे, असा राण्यानें निश्चय केला होता. आणि ह्मणून, त्याचें राज्य या येवढ्या धामधुमींत कांहीं वाढलेलें दिसत नाहीं. मेवाडचें राज्य जास्त न वाढण्यास त्या राज्यांतील दोन शूर घराण्यांत जे तंटे लागले होते तें दुसरें एक कारण झालें. प्रसिद्ध सुक्तावत घराण्यांतील जैतसिंग (जितसिंह) याणें ईडर येथून राठोडांस घालवून, कोळीवाडा येथून रानटी भील वगैरेंनाही हुसकून दिलें. परंतु, राण्याला त्याच्या त्या शौर्याचे कृत्यानें मत्सर उत्पन्न होऊन, त्यानें यास मध्येंच परत बोलावल्यामुळें, त्याचा तो विजय तसाच अपूर्ण राहिला. ह्या आपसांतील मत्सरानें अर्थात् मेवाडांतील पूर्वीचें शौर्य व उत्साह हीं घटत चालली. मेवाडच्या राज्यांत दिवसेंदिवस भरभराट व्हावयाची; परंतु तसें न होतां, उलट त्या मत्सरानें त्याची पूर्वीची कळा बदलत चालली. कोणाही संस्थानिकास व अधिकाऱ्यास आपल्या संस्थानामध्ये व अधिकाराच्या हद्दींत किल्ले कोट बांधण्याची परवानगी नव्हती. इतकेंच नव्हे; तर, तीन तीन वर्षांनीं अधिकारी बदलण्याची वहिवाट असल्यामुळें, त्या त्या प्रांतांत व्हावी तशी काळजीनें व अभिमानपुरस्सर सुव्यवस्था होण्यास मोठी अडचणच होती. बहुतेक जमिनी इनामवतनांवारीं वांटल्या गेल्या होत्या. त्या भागांत ज्या टेंकड्या होत्या त्याच त्यांचे लढाया करण्याचे किल्ले, आणि सरहद्दीवर जे किल्लेकोट बांधलेले असत तीं परचक्राच्या वेळचीं त्यांच्या कुटुंबांची आश्रयस्थानें झालेलीं असत. मोंगलांच्या वैभवाचा व शक्तीचा जसजसा कमी कमी कल होत चालला तसतशी आपल्या संरक्षणाची काळजी बाळगून त्या

---

१. जगताचा शेवट यास भाट लोक 'जगत्खुंट' ह्मणतात. ह्या जगत्खुंट त्यांच्या मतानें द्वारकाबेट ह्राच होता. त्याचे पुढें अगाध समुद्र असल्यामुळें तेथेंच जगाचा अंत झाला, अशी त्यांची समजूत होती, व ही समजूत त्या वेळीं या देशांत जें भूगोलसंबंधी अज्ञान होतें त्याला अनुसरूनच होती. ह्या द्वारकाबेटावर, पुढें, राठोडांची एक 'भादेल' ह्मणून शाखा आहे तिनें वसाहत केली होती.

संरक्षणाचीं साधनें आपल्याजवळ सिद्ध ठेवण्याचीही कोणी पर्वा करीतनासे झाले. अशी शौर्यवीर्यदर्शनाची चोहोंकडे उदासीनता दिसूं लागली. परंतु, पुढें मराठे आणि पठाण यांच्या लुटारूपणाचे जे दंगे जोरावत चालले त्यांपासून आपल्या देशाचें संरक्षण व्हावें ह्मणून, मेवाडामध्यें किल्लेकोट बांधण्याची पुनः सुरवात झाली. हे किल्लेकोट बांधल्यामुळें, अगदीं आलीकडे आल्दिकडे जीं बंडें उत्पन्न झालीं होतीं त्यावेळीं त्यांचा फारच उपयोग झाला.

राणा संग्रामसिंग यानें १८ वर्षें राज्य केलें. वर लिहिल्याप्रमाणें त्याजमध्यें मात्सर्यभाव होता, तरी, त्यानें मेवाडचें वैभव व मान हीं बहुशः कांहीं कमी होऊं दिलीं नाहींत. मेवाडचा कांहीं मुलूख गेला होता तो त्यानें फिरून मिळविला. त्यानें बिहारीदास पंचोली यास जी आपली दिवाणगिरी दिली, त्या निवडणुकीमध्यें त्याची कुशाग्रबुद्धि विशेष दिसून येते. कारण, ह्या बिहारीदास पंचोली दिवाणा-सारखा हुशार आणि प्रामाणिक प्रधान मेवाडच्या राज्यांत यापूर्वी व याचे पुढें कधींच आला नाहीं. राणा संग्रामसिंग याचे समकालीन जे राजे होते त्यांचेकडून जीं बि-हारीदासाला अनेक पत्रें गेलेलीं मेवाडच्या दफ्तरांत सांपडतात, त्या सर्वांवरून त्याची बुद्धिमत्ता व त्याचें भवितव्याविषयीं धोरण यांची सर्व पत्रलेखक तारीफच करीत आहेत, असें दिसतें. बिहारीदास हा त्या धोरणी वर्तनावरून त्या कालीं एक भविष्यवादीच बनला होता, असें दिसतें. याविषयीं मागें २८४ पृष्ठांत टिपेमध्यें जें नागोरचा राजा बखतसिंग याचें पत्र दिलें आहे त्यावरून विशेष खुलासा होईल.[1] बिहारीदास यानें मेवाडचा कारभार तीन राजांचे कारकीर्दींत केला. परंतु तो इतका धोरणी व वस्ताद असतां, राणा संग्रामसिंग याचे मृत्यूच्या वेळेपासून जी मराठ्यांची दंगल माजली, तिच्यावर त्याची कांहींच योजना व तोड झाली नाहीं, असें दिसतें.

राणा संग्रामसिंगाचे संबंधाच्या अनेक दंतकथा व आख्यायिका लोकांचे सांग-ण्यांत येतात; त्यांवरून त्याचें राज्यकौशल्य, त्याचा कायदेबाजपणा व त्याचें घरगुती आचरण हीं मोठीं प्रशंसा करण्यासारखीं होतीं; असें दिसतें. लोक तर असें ह्मण-तात कीं, राणा संग्रामसिंग हा शहाणा, सत्यप्रिय, व्यवस्थित, नियमित, राजकीय व खाजगी कामांत मितव्ययी, प्रशस्त व झगझगीत कायदे करण्यांत वाकब, त्या काय-द्यांची अंमलबजावणी करण्यांत दक्ष, आणि तसाच हटाग्रही असे. संग्रामसिंगाच्या हटाग्रहाचें व मात्सर्यदोषाचें एक जैतसिंग सुक्तावतसंबंधाचें उदाहरण वर आलें आहेंच. तरी त्याजमध्यें दुसरा एक असा सुगुण होता कीं, कोणास उगाच न दु-खवतां, त्याची सूचना घेण्यासारखी असल्यास घ्यावी. याविषयीं एक गोष्ट अशी

[1] १. पेशवाईमध्यें पुण्यांत ज्या प्रकारें सखाराम बापू व नाना फडणीस हे राज्यकुशल व धोरणी पुरुष होऊन गेले, त्या प्रकारचाच बिहारीदास पंचोली हा पुरुष मेवाडांत होऊन गेला.

सांगतात कीं, कोटारियोचा चव्हाण ह्मणून राण्याच्या थोर सरदारांपैकीं एक सरदार होता. त्याणें एके दिवशीं राण्यास अशी सूचना केली कीं, 'दरबारांत सरदार वगैरेंस यावयाचें तेव्हां त्यांच्या पेहरावयाच्या झग्याचा घेर जास्त असावा.' चव्हाण सरदाराचें हें ह्मणणें ताबडतोब राणा संग्रामसिंग याणें कबूल केलें, व त्यामुळें त्याला आपल्या सूचनेचा मान झाला ह्मणून मोठा आनंद होऊन, तो आपल्या संस्थानांत परत गेला. इकडे, राण्यानें चव्हाण सरदाराचे सूचनेप्रमाणें सर्वांना दरबारी पोषाखांत फेरफार करण्याविषयीं तर हुकूम केलाच; परंतु, त्याच वेळीं त्याणें आपल्या प्रधानास कळविलें कीं, 'चव्हाण सरदारांचे दोन गांव आपल्याकडे सरकारी खात्यास जमा करावे.' त्याप्रमाणें ते दोन गांव खालसा झाल्याची बातमी कोटारियो येथें चव्हाण सरदारास समजली. त्याबरोबर तो धांवत उदेपुरास राण्याकडे येऊन, त्याणें राणेसाहेबांची विनंति केली कीं, 'खावंदांचा या सेवकाकडून काय अपराध झाला, ह्मणून माझे दोन गांव सरकारांनीं जप्त केले?' त्यावर राण्यानें त्या सरदारास उत्तर केलें, 'रावजी, अपराध कांहीं नाहीं. परंतु तुह्मीं जी दरबारी पोषाखांत सुधारणा करण्याविषयीं सूचना केली, त्याप्रमाणें सुधारणा करण्यांत जो जास्त खर्च होणार तेवढा जास्त खर्च तुमच्या या जप्त केलेल्या दोन गांवांच्या उत्पन्नांतून अगदीं तंतोतंत भागला जात आहे. माझें उत्पन्न पाहिलें असतां तें चोहोंकडे सारखें वांटलें गेल्यामुळें, तुमची सूचना कबूल करून, त्याप्रमाणें लागणारा जो जास्त खर्च करण्यास पाहिजे तो जास्त खर्च तुमच्या उत्पन्नांतून घेतल्याशिवाय सोयच नाहीं!' हें राण्याचें भाषण ऐकून चव्हाण सरदारानें पुनः विनंति केली कीं, 'मीं केलेली सूचना परत घेतां, व त्याप्रमाणें आपण दिलेला हुकूम पुनः फिरवावा. मी आतां खावंदांच्या जुन्या व पोक्त कायद्यांपेक्षां आणि चालत आलेल्या दस्तुरापेक्षां फाजीलपणाच्या सूचना वगैरे कधींही करणार नाहीं. झालेला गांवच्या जप्तीचा हुकूम मात्र फिरवावा.'

राणा संग्रामसिंग याचे व्यवस्थितपणाविषयीं दुसरी एक गोष्ट सांगतातः ह्या राण्यानें आपल्या खाजगी खर्चाची इतक्या पूर्ण रीतीनें व्यवस्था व टापटीप लावून दिली होती कीं, त्याबद्दलची कोणत्याही प्रकारें तक्रार येऊं नये. मुदपाक, जामदारखाना, खाजगत खर्च, जनानखाना, वगैरे निरनिराळ्या खात्यांकडे निरनिराळे गांव नेमून देऊन, त्यांजवर निरनिराळे कामदार व अधिकारी नेमिले होते. कीं, त्या त्या खात्याकडची कुरकुर ह्मणून येऊं नये. एके वेळीं असें झालें कीं, राण्यानें, विस्मरणानें साखरेकडे नेमून दिलेला गांव दुसऱ्या कोणत्या बाबीवर चढवला. पुढें, एके दिवशीं, राणा आपल्या भोजनमंदिरांत आपल्या सरदारांसहवर्तमान भोजनास बसला

असतां, जेवणारांचे पात्रांवर आचाऱ्यानें दहीं वाढलें, परंतु त्यावर साखर वाढावयाची ती वाढली नाहीं. तेव्हां राण्यानें मुदपाकावरील मुख्याधिकाऱ्यास हांक मारून विचारिलें, 'वांकनीस! आज दह्यावर साखर कां वाढली नाहीं?' तेव्हां वांकनिसानें हात जोडून नम्रतेनें उत्तर केलें, 'खावंद! अन्नदाता! प्रधानजींनीं सांगितलें कीं, साखरेकडे दिलेला गांव सरकारांनीं दुसऱ्या बाबीकडे ओढला आहे. ह्मणून आतांशीं साखर मिळतच नाहीं.' 'बरोबर आहे,' असें राण्यानें उत्तर करून, त्यानें व त्याचे सरदारांनीं तें दही तसेंच साखरेवांचून चपाटलें. या गोष्टीवरून त्याची व्यवस्था आणि टापटीप कशी होती हें सहज समजते.

राणा संग्रामसिंग याच्या विलक्षण हट्टाची आणि लहरीपणाची एक गोष्ट प्रसिद्ध आहे. पूर्वदेशीय राज्यांत बायकांनीं कारभार करून उलाढाली करण्याची जी रीति आहे, तें एक केवळ विषच आहे; व त्यामुळें मोठमोठीं राज्ये रसातळाला पोंचलीं आहेत, असें अनेक उदाहरणांवरून इतिहासज्ञांस कळत आहेच. राणा संग्रामसिंग जेव्हां गादीवर बसला तेव्हां तो अज्ञान होता; ह्मणून त्याची आई, रजपुतांच्या रीतीप्रमाणें, राज्यकारभार बघत असे. ह्या त्याच्या अज्ञानावस्थेत त्याला अतिशय पारतंत्र्य भोगावें लागलें, व त्यामुळें तो अत्यंत त्रस्त झाल्यासारखा झाला होता. त्या पारतंत्र्याचे पाश तोडून तो नुक्ताच मोकळा झाला होता; व स्वतंत्रतेनें आणि न्यायानें राज्य करीत असतां, कांही कारणावरून त्याणें दर्यावड येथील संस्थानिकाचा मुलूख जप्त केला. राणा हा कधींही कोणावर अन्यथा राग करून कोणास व्यर्थ शासन करणारा नव्हे, अथवा, शासन करण्यास असमर्थ ह्मणून कोणाच्या अपराधांची माफी करणाराही नव्हे, अशी त्याची चोहोकडे प्रसिद्धि होती; व त्यावरून, वरील संस्थानिकालाही राण्याजवळ कोणत्या सबबीनें माफी मागून जप्त झालेला आपला मुलूख परत देण्याविषयीं विनंति करावी, हें मुळींच समजेना. त्याचा मुलूख जप्त झाल्यामुळें, अर्थात्, त्याचा अपराध खरा असल्यामुळें, त्याला दरबारांत देखील येण्याची लाज वाटून, तो तोंडटाळणी करूं लागला; व ह्याप्रमाणें, जणूं काय तो मनुष्यांतून उठल्यासारखा झाला. तो ह्या लाजेमुळें दोन वर्षेपर्यंत अगदींच कोठें बाहेर निघाला नाही, व त्यानें आपलें तोंड कोणासही दाखवलें नाहीं. पुढें, त्यानें राण्याच्या आईचे दासींकडून संधान राखून, त्यांच्या मार्फत त्या राणीकडे, आपला जप्त झालेला मुलूख मिळण्याविषयींचा एक अतिनम्रतेचा विनंतिअर्ज पाठविला; व 'हें कार्य झाल्यास ह्या संबंधानें मध्यस्थी करण्याबद्दल मी दोन लाख रुपये देईन' अशी एक इनामचिठी त्या अर्जाबरोबरच पाठविली. तो अर्ज व ती चिठी त्या राजमातेकडे जाऊन पोहोंचलीं. राण्याचा असा नियम असे कीं, प्रत्यहीं भोजनाचे पूर्वी

एक वेळ आपल्या प्रिय मातोश्रीचें दर्शन घेऊन व तिला भेटून आणि तिच्या बरोबर कांहीं वेळ गोष्टी वगैरे करून नंतर जेवावयाला जावयाचें. त्याप्रमाणें, एके दिवशीं, राणा आईचे दर्शनासाठीं तिच्याकडे जाऊन रीतीप्रमाणें गोष्टी करीत बसला असतां, तिनें हळूच त्या संस्थानिकाची गोष्ट काढली, व त्याचा जप्त केलेला मुलूख त्याला परत देण्याविषयीं मोठ्या आग्रहाची शिफारस केली. राज्यकारभारांत बायकांनीं अनधिकार मन घालून अशा प्रकारच्या शिफारशी करणें किंवा एखाद्याची तरफदारी करणें, हें राण्याला बिलकुल आवडत नव्हतें. परंतु, ज्या अर्थी ही येवढी आग्रहाची शिफारस आपल्या मातोश्रीकडून आली आहे त्या अर्थी, तिच्यापासून कसें तरी दूर होऊन, हा स्त्रीसंबंध तोडण्याचे विचारास तो लागला असावा, असें पुढें घडलेल्या गोष्टीवरून दिसतें. राणा संग्रामसिंग यानें, आईची ती आग्रहाची शिफारस ऐकिल्याबरोबर, दर्यावडच्या संस्थानिकाचे मुलखावरची जप्ती उठविल्याचा एकदम हुकूम दिला. उदेपुरच्या दरबारची गोष्ट अशी असे कीं, कोणताही हुकूम राण्याकडून सुटला म्हणजे, त्या हुकमाची बजावणी हुकूम सुटलेल्या मित्तीपासून आठ दिवसांनी व्हावयाची. तोपर्यंत तो हुकूम, राण्याचे अष्टप्रधान[1] असत त्यांचे हातीं त्यांचे अवलोकनार्थ जाऊन, त्यावर त्या प्रत्येक प्रधानाची सही होई; आणि ह्याप्रमाणें अष्टप्रधानांच्या सह्या होऊन नंतर त्या हुकमाची, वर लिहिल्याप्रमाणें, आठ दिवसांनी बजावणी होई. परतु, ह्या वेळीं, राण्यानें अष्टप्रधानांच्या सह्यांची वगैरे बिलकुल वाट न बघतां त्या दिलेल्या हुकमाप्रमाणें ताबडतोब बजावणी केल्याचा दाखला बसल्या ठिकाणींच मागितला. तेव्हां त्याप्रमाणें होण्यास उशीर कसचा ? "राजा बोले आणि दळ हाले," ह्याप्रमाणें, ताबडतोब त्याचे हुकमाची बजावणी झाली व त्याबद्दलचा दाखला राण्याकडे येऊन पोहोचला. तो दाखला आल्यानंतर तोच कागद मोठ्या अदबीनें राण्यानें आपल्या मातोश्रीच्या हातीं दिला; आणि, त्या संस्थानिकाची ती इनामचिट्ठी त्याजकडे आली तशीच परत पाठविण्याविषयीं आईला विनंति करून, आपलें कर्तव्य आपण केलें असें तिला समजावून, त्यानें नम्रतापूर्वक मातोश्रीचे चरणीं नमस्कार केला. व नंतर तो भोजनासाठीं निघून गेला.

राण्यानें दुसरे दिवशीं रोजच्यापेक्षां दोन घटका अगोदर भोजनाची तयारी करण्यास सांगितलें, व त्याप्रमाणें तो लौकर भोजन करून दरबारांत निघून गेला. त्या

---

१. मेवाडचे दरबारच्या अष्टप्रधानांचेंच अनुकरण पुढें दक्षिणेकडे शिवाजी महाराजांनीं केलें; व मेवाडच्या दरबारानें दाशरथी राजा रामचंद्र यांच्या दरबारचें अनुकरण केलें होतें, अशी परंपरा लागते.

दिवशीं तो नित्यनियमाप्रमाणें आईच्या भेटीकरितां गेला नाहीं; व यामुळें सर्वांना फारच आश्चर्य वाटलें. सर्वांत राणीला (राजमातेला) फारच आश्चर्य वाटलें. परंतु दरबारच्या निकडीचे कामामुळें तो नियमाप्रमाणें आपल्या भेटीस आला नसेल असें मनांत आणून, त्या दिवशीं तिणें समाधान मानिलें. परंतु, दुसरे दिवशीं व त्यापुढेंही दररोज, राण्याचें ह्मणून आईच्या भेटीला जाणें झालें नाहीं; व ह्यामुळें राणीला फारच वाईट वाटलें. ती, आपल्या पुत्राचें आपल्यावरील प्रेम व भक्ति हीं अशीं एकाएकीं लय कां पावलीं, ह्याबद्दलचा आपल्या मनांत विचार करूं लागली. परंतु तिला, दर्यावडच्या संस्थानिकाचे संबंधानें केलेल्या शिफारशीशिवाय आपल्याकडून दुसरें कांहीं अनधिकार काम केल्याचें आठवेना. आणि, राण्याची मातृभक्ति उडण्यास तर हेंच वास्तविक कारण झालें होतें. राणीनें आपल्या मुलाचे प्रधानास (दिवाणबहादूर बिहारीदास यास) बोलावून आणून, त्याला झालेली सर्व हकीकत कळविली; व कसेंही करून त्यानें राण्याला आपले भेटीस आणावें, अशी तिनें त्याला गळ घातली. परंतु प्रधानानें नम्रतेनें सांगितलें कीं, 'राणेसाहेबांशीं राज्यप्रकरणीं मात्र काय त्या माझ्या मसलती चालतात. घरगुती प्रकरणांत मीं राणेसाहेबांशीं बोलावें असा माझा दस्तुर नाहीं; व तसा दस्तुर नसूनही, मी मातोश्रींचेसाठीं जर राणेसाहेबांकडे गोष्ट काढली तर ते ती ऐकणार नाहींत, अशी माझी खात्री आहे. ह्याप्रमाणें, प्रधानानेंही त्या मातापुत्रांचें ऐक्य करून देण्याचें अंगाबाहेर टाकल्यावर, राणीनें इतर कांहीं तसेच उद्योग चालवून, एकवार आपल्या पुत्रानें आपल्याला भेटून जावें, ह्मणून आणखी पुष्कळ खटपट केली. परंतु ती सर्व खटपट व्यर्थ जाऊन, ती पुत्रमुखावलोकनाविषयीं अगदीं निराश झाली ! नंतर तिनें वैतागून काशीयात्रेला जाण्याचा आपला हेतु राण्यास कळविला. तो हेतुही राण्यानें पसंत करून, त्याप्रमाणें, राजमातेला योग्य असा इतमाम तिचेबरोबर देऊन, तिची यात्रेकरितां रवानगी केली. राणीला वाटलें होतें कीं, निदान मी यात्रेला निघण्याचे दिवशीं तरी आपला मुलगा आपल्याला येऊन भेटेल. परंतु त्याप्रमाणें राणा मुळींच आईकडे गेला नाहीं. राणीची अगदीं निघण्याची वेळ आली व तिला प्रतिक्षणीं वाटत असे कीं, आपला प्रिय पुत्र आपल्या भेटीसाठीं एकवार तरी येईल; पण, राण्यानें, आपल्या लहरीमध्यें, जो मातृमुखावलोकन न करण्याचा निश्चय केला होता तोच शेवटपर्यंत पाळून, मातोश्री राणीसाहेब यात्रार्थ रवाना झाल्याचें त्याला कळलें तरी, तो ह्मणून तिच्या दर्शनास गेला नाहीं !

राणी पहिल्यानें मथुरेस जाण्याकरितां निघाली; व तेथें व्रजवासी श्रीकृष्णाचें दर्शन घेऊन त्याचें पूजन करावें असा तिचा हेतु होता. मथुरेस जातांना ती अं-

मेरनगरावरूनच गेली. अंबेरचा महाप्रसिद्ध राजा जयसिंग हा राणीचा जांवई होता.[१] ह्मणजे, राणा संग्रामसिंग याची बहीण राजा जयसिंग यास दिली होती'. आपल्या सासूबाई आपल्या नगरावरून यात्रार्थ जात आहेत अशी बातमी राजा जयसिंग यास दूतमुखें कळून, तो मोठ्या थाटानें राणीला सामोरा गेला; व त्यानें तिला आग्रह करून, एकवार आपल्या नवीन बांधलेल्या जयपूर नगरांत येऊन जावें, अशी विनंति केल्यावरून, तिनें त्याप्रमाणें मुलीच्या सासरीं थोडा वेळ मुक्काम करण्याचें कबूल केलें. राजा जयसिंग यानें आपल्या सासूला मान देऊन, तिच्याविषयीं आपण किती भक्ति व पूज्यबुद्धि बाळगतो हें दाखविण्यासाठीं, राणीची पालखी जयपूर शहराकडे येत असतां त्या पालखीला स्वतःचा खांदा लावून, तिला बहुसन्मानपुरस्सर आपल्या राजधानीमध्ये नेलें. त्याचप्रमाणें, पहिल्यानें राणीच्या तोंडून राण्याच्या तऱ्हेवाईक वर्तनाचेंही वृत्त त्यानें ऐकून घेऊन, त्याबद्दलची योग्य व्यवस्था लावून मातापुत्रांचें पूर्ववत् ऐक्य करून देण्याचें त्यानें राणीला अभिवचन दिलें. तेव्हांही त्यामुळें राणीनें जांवयाच्या पाहुणचारांचा विशेष प्रेमानें आदर केला. पुढें राणीला ज्या काय यात्रा मात्रा करावयाच्या होत्या त्या करून, ती परत उदेपुरास यावयाला निघाली. येतांना, जांवयानें कबूल केल्याप्रमाणें, त्याला मुलाची समजूत घालण्यासाठीं ह्मणून बरोबर घेण्याकरितां ती जयपुरास आली. व तेथून राजा जयसिंगाला बरोबर घेऊन, ती उदेपुरास येऊन पोहोंचली.

आई आल्याची बातमी राण्याला पोहोंचून, तिच्या बरोबर आपला मेहुणा राजा जयसिंग हाही आला आहे हें राण्याला कळल्यानंतर, मोठ्या इतमामासह तो त्याला सामोरें जाण्यासाठीं निघाला. रजपूत लोकांतील पाहुणचार स्वीकारण्याच्या रीति तरी मोठ्या ताठरपणाच्या आणि अटीच्या असतात. राणा आपल्याला सामोरा येत आहे असें ऐकिल्याबरोबर राजा जयसिंग यानें त्याला, 'आपण या वेळीं कां आलों,' वगैरे सर्व कळवून, 'ज्या कार्यासाठीं मी येवढी आपली राजधानी सोडून आलों आहें तें कार्य करण्याचें तुह्मी कबूल करीत असाल तर तुह्मांकडून मिळणाऱ्या पाहुणचारांचा मजकडून स्वीकार होईल, नाहीं तर होणार नाहीं,' असा आपला हेतु समजविला. तेव्हां राण्यानें मेहुण्याचा तो हेतु कबूल करून, राजा जयसिंग उदेपुरापासून एक मुक्कामावर होता तेथपर्यंत त्याला सामोरें जाऊन, त्याचें स्वागत

---

१. वर लिहिल्याप्रमाणें राण्याची बहीण राजा जयसिंगास दली होती व राजा जयसिंग याची बहीण राणा संग्रामसिंग याला दिली होती. ह्याप्रमाणें, ते उभय राजे एकमेकांचे ह्यालक (बायकोचे भाऊ) होते.

करण्यासाठीं तो निघाला. तो जातां जातां, जयसिंगाचे भेटीस जाण्याचे पूर्वींच, त्याच्या आईचे शिबिरांत (तंबूंत) जाऊन, त्यानें तिला प्रणाम केला; व तिचा आ-शीर्वाद घेऊन, नंतर तो मेहुण्याचे भेटीस गेला. आणि तेथून आपल्या मातोश्रीस व मेहुण्यास सत्कारपूर्वक उदेपुरास आणून, राणीचे यात्रासांगताप्रीत्यर्थ राण्यानें मोठा उत्सव केला. ह्याप्रमाणें, राण्यानें हा कुटुंबकलह फारसा वाढूं न देतां, लौकरच उमजून व समजून घेऊन, तो घरांतल्या घरांत मिटविला; व कुटुंबकलह घरांतल्या घरांत मिटविणें हाच शहाणपणाचा व अनुकरणीय मार्ग आहे, असें त्यानें आपल्या समकालीन राज्यकर्त्या पुरुषांस हें एक उदाहरण दाखवून सूचित केलें; असें रजपूत ग्रंथकर्त्यांचें ह्मणणें आहे.

राणा संग्रामसिंग हा आपल्या हाताखालील लोकांच्या शौर्यपराक्रमास किती मान देत होता व त्याचें त्यांच्या कृत्यांवर कसें लक्ष्य होतें, याविषयींची एक आख्यायिका प्रसिद्ध आहे. ती प्रसंगवशात् येथें दिली पाहिजे. एके दिवशीं तो भोजनास बसला असतां अशी बातमी येऊन पोहोंचली कीं, माळव्याचा पठाणांनीं मंदोसरप्रांतांतील कित्येक खेडीं लुटलीं, व ते तेथील लोकांस मारून व कैद करून नेत आहेत. ही बातमी राण्याचे कानीं पडतांच, त्यानें पुढचें ताट तसेंच हातानें पुढें लोटलें, व आपला युद्धाचा पोषाख व शस्त्रास्त्रे आणण्याचा हुकूम केला; आणि सर्व सैन्यानें युद्धाला जाण्यास सिद्ध होण्याच्या सूचनेचा नगारा ठोकण्यास सांगितलें. त्याप्रमाणें नगारा झाल्याबरोबर त्याचें सर्व लष्कर सज्ज होऊन राजवाड्यापुढें येऊन उभें राहिलें. राणाही आपलें चिलखत चढवून सिद्ध झाला. परंतु त्याचे सरदारांनीं त्याची विनंति केली कीं, 'ह्या मोहिमेवर आपण स्वतः येण्याचें कारण नाहीं. शत्रु क्षुद्र आहेत, त्यांचा पराभव करून आह्मी आतां जाऊन येतों. आपण राजवाड्यांतच स्वस्थ असावें.' राण्यानें सरदारांचा हेतु समजून, त्याप्रमाणें स्वतः शत्रूंवर जाण्याचा बेत रहित करून, सरदारांसच तिकडे पाठविलें. ते लोक रवाना होऊन फार वेळ झाली नाहीं तोंच कान्होरचा ठाकूर, राण्याच्या हुकमाप्रमाणें तेथें दाखल झाला. तो नुक्ताच चातुर्थिक ज्वराचे आजारांतून उठला होता, व मनस्वी अशक्त झाला होता. परंतु राण्याचें बोलावणें आल्याबरोबर त्यानें आपल्या आजारीपणाची वगैरे कांहींएक सबब न सांगतां, तो आपल्या घोड्यावर बसून तावडतोब वर सांगितल्याप्रमाणें राण्याचे पुढें येऊन हजर झाला. तों राण्याचे सरदार वगैरे सर्व, शत्रूंवर रवाना देखील झाले होते. राण्यानेंही ठाकूर याची आजारी प्रकृति बघून, आतां स्वस्थ वाड्यांतच राहण्याविषयीं सांगितलें. परंतु 'बिछान्यावर पडून राहण्यापेक्षां राजकार्यांत धारातीर्थीं पडणें मला अधिक बरें वाटतें,' असें त्यानें रा-

त्याला उत्तर देऊन, राण्यानें त्याला लढाईवर न जाण्याविषयीं पुष्कळ सांगितलें तरी त्यानें कांहींएक न ऐकतां, तो तसाच पुढें जाऊन, राण्याचे फौजेला मिळाला. नंतर पठाणांचें व रजपुतांचें मंदोसरप्रांतांत मोठे युद्ध झालें. त्यामध्यें कान्होरच्या ठाकुरानें मोठा पराक्रम केला, व थोड्याच वेळांत शत्रूंचा पराजय करून त्यांस पळवायास लाविलें. परंतु, शेवटीं त्याला एक ¹गोळी वर्मी लागून, तो त्या लढाईत समरांगणींच मरून पडला. व त्याच प्रमाणें, त्याचे शेजारीं त्याचा मुलगाही गोळी लागून जखमी होऊन पडला. परंतु आपल्याला जय मिळाला ह्मणून, त्या ठाकूरपुत्राला आपला बाप पडल्याचे व आपणा स्वतःला जखम झाल्याचें बिलकुल वाईट वाटलें नाही. पुढें राण्याची विजयी फौज त्या जखमी ठाकूरपुत्रासह उदेपुरास आली; तेव्हां राण्यानें त्याच्या बापाचा व खुद्द त्याचा पराक्रम ऐकून त्याचें उत्तम प्रकारे स्वागत केलं, व त्याला त्यानें स्वतः आपल्या हाते विडा करून दिला. हा येवढा आपल्या बरोबरीचा मान राणेसाहेबानी आपल्याला दिला हे पाहूनच ठाकूरपुत्र आपल्या जखमेचें दुःख अगदी विसरला. त्याला आपल्या व आपल्या पित्याच्या शौर्यास व राजनिष्ठेस हे फार मोठे बक्षीस मिळालें असें वाटून, त्याने राण्याचे मोठे उपकार मानिले; आणि त्याला मोठी धन्य धन्य झाली. राण्याच्या ह्या अशा गुणपरीक्षेनें त्याच्या पदरच्या लोकांस मोठमोठीं पराक्रमाची व धाडसाची कामे करण्यास साहजिकच विलक्षण आवेश येत जावा, हें आतां वेगळें सागणे नकोच. आपल्या गुणाचे योग्य परीक्षण होऊन, त्यांची नीट रीतीनें बूज राखण्यात येत आहे, असे हाताखालच्या लोकांस कळून आल्यावर, त्याना आपल्या वरिष्ठावर प्रेम ठेवण्यास सागायाला नकोच.

दुसऱ्या एका प्रसगी, एका चोमड्या व खुषमस्करी मनुष्यानें राण्याचा मुख्य सरदार साळुंब्याचा रावत याचेविषयी भलताच कांही सशय आणि वहीम धरण्यासारख्या भलभलत्या गोष्टी सांगून, त्याजबद्दल राण्याचें मन दूषित करण्याचा प्रयत्न केला. त्या खुषमस्कऱ्याला अशा प्रकारचा चोमडेपणा करण्यास कारण इतकेंच झालें कीं, त्या सरदारानें राण्याकडून, माळव्यातली मोहीम आटोपल्यावर एकदां आपल्या सस्थानीं जाऊन येण्याची परवानगी घेऊन ठेविली होती. परंतु तेवढ्यावरून, वरील खुषमस्कऱ्याला, काही तरी लावालावी करून राण्याचे मनांत त्याचेविषयीं वांकडें

१. राण्याने स्वतः आपल्या हातें विडा करून देणे, यासारखा मान व मोठेपणा दुसरा कोणताही नाहीं, असे रजपुतांत समजत असत. कान्होरचा ठाकूर हा, पहिल्या प्रतीचा नव्हेच, पण, दुसऱ्या प्रतीचा सरदार असतांना, राण्याने त्याच्या पराक्रमावरून त्याला केवळ आपल्या बरोबरीचा समजून त्यास विडा दिला; हा फारच मोठा मान झाला, हें उघड आहे.

आपण्याची बरी संधि आहे असें वाटून, त्यानें, वर सांगितल्याप्रमाणें, राण्याचें मन साळुंब्याच्या रावताविषयीं कलुषित करण्याचा पुष्कळ प्रयत्न केला. पण राणा संग्रामसिंग हा खुषमस्कऱ्यांच्या सांगण्यावर आणि गोडगोड व आर्जवी भाषणांवर खुष व बहाल होऊन, भलभलतीं कामें करणारा नसल्यामुळें, त्याणें त्या चोमड्या खुषमस्कऱ्यास, तो जें भलभलतें बोलत होता तें अगदीं खोटें आणि द्वेषमूलक आहे, असें पुनः पुनः बजावून सांगितलें. तरी त्याचा आग्रह जाईना. तेव्हां, त्याचें ह्मणणें सर्वांशीं खोटें आहे, हें सिद्ध करून दाखविण्याकरितां राण्यानें पुढील युक्ति योजिली. साळुंब्याचा रावत माळव्यावरची मोहीम आटोपून उदेपुराकडे परतला असतां त्याणें आपल्या सैन्यांतील लोकांस थोडथोडी विश्रांति मिळावी ह्मणून आपापल्या घरीं जाण्यास रजा देऊन, आपणही, राण्याचा हुकूम घेऊन ठेवला होता त्याप्रमाणें, थोडी विश्रांति व गृहसौख्य भोगण्याकरितां ह्मणून आपल्या संस्थानीं जाण्यास निघाला. त्यानें, आपण येणार ह्मणून पुढें अगोदरच घरीं निरोप पाठविल्यावरून, त्याची बायको, मुलें वगैरे त्याची अगदीं मार्गप्रतीक्षा करीत बसलीं होतीं. इकडे, राण्यानें आपला एक जासूद त्याच्या संस्थानीं पाठवून, तो आपल्या घरीं पोहोंचतो आहे तोंच त्यास उदेपुरास बोलावलें आहे, ह्मणून हुकमाचा कागद देण्यास सांगितलें. साळुंब्याचा रावत फार दिवसांनीं घरीं जात असल्यामुळें त्याला या वेळीं आपल्या कुटुंबीय मनुष्यांस भेटण्याची फारच उत्सुकता झाली होती. तो आपल्या वाड्याशीं पोहोंचून घोड्यावरून उतरण्याकरितां रिकिबींतला पाय काढतो आहे तोंच, इकडून राण्यानें मुद्दाम पाठविलेला जासूद मोठ्यानें ओरडून ह्मणाला, 'रावतजी ! राणेसाहेबांनीं आपलें कुशल विचारून आपल्याला हें पत्र दिलें आहे.' रावताचा एक हात दरवाजावरच होता, व तेथें वर सांगितल्याप्रमाणें, त्याची प्रिय पत्नी आपला पति फारां दिवसांनीं आला, व मुलें, आपला पिता पुष्कळ दिवसांनीं आपल्याला भेटणार ह्मणून, मोठ्या उत्कंठेनें त्याला सामोरीं येऊन त्याचें स्वागत करण्यास आनंदानें उभीं होतीं; इतक्यांत, तें राण्याचें पत्र त्याच्या हातांत पडलें. तें पाहून, तो तसाच फिरून घोड्यावर बसला; आणि सुमारें पांच सहा स्वार बरोबर घेऊन, त्याच पावलांनीं मागे वळून तो उदेपुराकडे जावयास निघाला. त्याची व त्याच्या कुटुंबीय मनुष्यांची पुरीशी दृष्टादृष्ट देखील झाली नाहीं; तोंच रावतानें आपल्या घोड्यास टांच मारली, आणि आपल्या राण्याचे पत्रांतील हुकमाप्रमाणें, त्याला भेटण्याकरितां तो जो त्वरेनें निघाला तो एका क्षणांत आपल्या मनुष्यांच्या दृष्टीपलीकडे निघून गेला! ह्याप्रमाणें, रावताचें कुटुंब मोठ्या बुचकळ्यांतच पडलें ! आकाशांत वीज चमकल्याबरोबर 'वीज' येवढीं अक्षरें बोलतों आहों तोंच ती जशी नाहींशी होते, तद्वत्

रावताच्या व त्याचे कुटुंबाच्या मनुष्यांचे भेटीचा प्रकार झाला! रावत आपल्या मनुष्यांकडे व मनुष्यें त्याचे चेहऱ्याकडे बघत आहेत तोंच, तो राण्याचा हुकूम हातीं पडल्यामुळें, तसाच घोड्याचा लगाम फिरवून तो उदेपुराकडे जाण्यास निघाला! तो राजधानीस येऊन पोहोंचेपर्यंत त्याणें हातांतला लगाम मोकळा सोडला नाहीं. तो उदेपुरास पोहोंचला तेव्हां मध्यरात्र झाली होती. तो संस्थानीं जाणार ह्मणून, त्यानें आपलीं उदेपूरच्या वाड्यांतलीं सर्व चाकरमाणसें आपल्या घरीं पाठविलीं असल्यामुळें, त्याचे वाड्यांत त्या वेळीं कोणी नव्हतें. तेव्हां अर्थात् त्याचे जेवणाची वगैरे सोय नव्हतीच. परंतु, राण्यानें हें सर्व लक्ष्यांत आणून, रावत आल्याबरोबर त्याचे घरीं त्याचे जेवणाखाण्याची आणि त्याचे घोड्यांच्या चंदीचाऱ्याची व्यवस्था नीट रीतीनें रहावी अशी सर्व तजवीज ठेविली होती. त्याप्रमाणें रावत आपल्या घरीं उतरून त्यानें आपलें जेवणखाण उरकलें. दुसरे दिवशीं सकाळीं रावत दरबारांत राणेसाहेबांचे भेटीस गेला. तों त्याला त्या दिवशींचा थाट कांहीं चमत्कारिकच दिसला! त्या दिवशीं, रावताला आपला राणा फारच आनंदांत आहे असें दिसून आलें. पुढें राण्यानें रावताला भेटून एक मोठा किंमतवान् उमदा घोडा व जडजवाहीर हीं बक्षीस दिलीं; इतकेंच नव्हे तर, शिवाय कांहीं जमिनीही त्याला इनाम दिल्या. ही सर्व राणेसाहेबांची असाधारण कृपादृष्टि पाहून रावताला फारच आश्चर्य वाटलें. व तो चोंडाचा वंशज असल्यामुळें, त्याला हें असें कामावांचून बक्षीस स्वीकारण्याचा तिरस्कार वाटून, त्यानें तें बक्षीस व तें इनाम स्वीकारण्याचें फार नम्रतेनें नाकारलें. तो मोठ्या अदबीनें राण्यास ह्मणाला, 'लढाईत मी पडलों जरी असतों तरी हें येवढें बक्षीस मला जास्त होतें.' तेव्हां, असें बक्षीस स्वीकारण्यासारखी आपल्या या ताबेदाराकडून खावंदांची काय नौकरी झाली आहे? त्यांतून, राणेसाहेबांना जर माझी विनंति मान्य करणें असेल तर, आपल्या कृपेचे स्मरणार्थ, यापुढें, मी किंवा माझे कोणी वंशज, असे आह्मी, आपल्या हुकमाप्रमाणें जेव्हां आमच्या संस्थानांतून आपल्या या राजधानीस येऊं, तेव्हां, काल जीं आह्मांस भांडीं वगैरे सरकारी मोदीखान्यांतून किंवा खुद्द राणेसाहेबांच्या पाकशाळेंतून मिळालीं होतीं, तीं सर्व भांडीं नेहमीं आह्मांस मिळत जावीं. येवढें देणें दिलें ह्मणजे त्यांत मला संतोष आहे.' रावताचें हें अगदीं साधें मागणें राण्यानें ताबडतोब कबूल केलें; व त्याच्या त्या हक्काचा व देणगीचा उपभोग त्या रावताचे वंशज अजून घेत आहेत!

ह्या सर्व गोष्टींवरून राणा संग्रामसिंग हा कोणत्या प्रकारचा मनुष्य होता व त्याचें मनुष्यपरीक्षण कसें काय होतें, हें समजून येण्यासारखें आहे. संग्रामसिंग याच्या स्वभावगुणशीलाचें वर्णन वेगळ्या रीतीनें आणि मोठ्या घोंसदार शब्दांनीं

करण्यापेक्षां, त्या संबंधानें घडलेलीं उदाहरणेंच साध्या रीतीनें सांगितलीं ह्मणजे वाचकांस खुलासा होणार आहे. संग्रामसिंगाच्या हट्टीपणामुळें कधीं कांहीं अप्रासंगिक वर्तन घडलें असेल तेवढें शिवाय करून, बाकी त्याची वर्तणूक फारच स्तुत्य होती. होतां होईल तितकें आपल्या देशाचें व आपल्या लोकांचें बरें करण्याकडे त्याचें सर्वदा लक्ष्य असे. आपल्या राज्याची हद्द न वाढवतां, होता तेवढा मुलूखच मोंगलांपासून रक्षण करण्यासाठीं देखील, त्याला एकंदर अठरा लढाया लढाव्या लागल्या. त्यानें होतें तेवढ्यांत संतुष्ट राहून, मुलूखगिऱ्यांकडे बिलकुल लक्ष्य दिलें नाहीं; तथापि, त्याची कीर्ति फार दूरवर गेली होती. तो आपल्या रयतेचा फार आवडता राजा होता, आणि त्याचेंही तिच्या कल्याणाकडे अतिशयच लक्ष्य असे. तो आपल्या प्रजेविषयीं मोठा क्षमाशील असून, तिचे लाड आणि कौतुक करण्यांतही संग्रामसिंगाचें नांव भाटलोक आपल्या कवितेंत फार घेतात. बाप्पा रावळाचे वंशांतील उदेपूरच्या गादीवर संग्रामराणा हा शेवटचाच पुरुष झाला. त्याचे अखेरीस मराठ्यांचा उठाव होऊन, पुढें उदेपुरच्या गादीचे वैभवास उतरती कळा लागली !

राणा संग्रामसिंगाचे मागून, त्याच्या चार पुत्रांतील वडील मुलगा जगत्सिंग हा, विक्रम संवत् १७९० ह्मणजे इ० स० १७३४ ह्या वर्षी, उदेपूरच्या गादीवर बसला. जगत्सिंग हा गादीवर बसल्यावर त्याचे राज्यांत पहिली मोठी गोष्ट ही झाली कीं, राणा उमरावसिंग याणें जो मागें सांगितलेला राजत्रयाचा तह[१] करून ऐक्यवर्धन करण्याची योजना केली होती, परंतु पुढें राजा अजितसिंग याणें त्या तहांतल्या अटी मोडून मोंगलांशीं शरीरसंबंधही केल्यामुळें जें ऐक्य विशकलित झालें होतें, तें ऐक्य पुनः साधण्यासाठीं, सर्व रजपूत राजांनीं एकवाक्यता केली. आणि, सर्व राजे अजमीरच्या सरहद्दीवर व मेवाडच्या हद्दींत हुर्ला ह्मणून एक गांव आहे तेथें जमले. नंतर त्यांनीं मेवाडच्या राण्याला आपल्या रजपूतराष्ट्रांचें पुढारीपण देऊन व मागें मोडलेला तह पुनः करून, त्या तहनाम्यावर सर्वांनीं सह्या केल्या. ह्या तहाचे वेळीं सर्व

१. तह—

राण्याची मुद्रा.

| श्रीएकलिंग.[१] |
|---|

| मान्यता. | मान्यता. | मान्यता. |
|---|---|---|
| सीतारामो जयति[२]. | व्रजाधीश[३]. | अभयसिंग[४]. |

" स्वस्ति श्री. आह्मी, एकत्र झालेलें राजचतुष्टय, खालीं लिहिलेलीं कलमें कबूल करीत असून

राजे आपापल्या सरदारांसहवर्तमान एकत्र झाले होते; व त्यांनीं, आपापलें लष्कर घेऊन, पावसाळा संपला कीं, राणा जगत्सिंग याचे हुकमाप्रमाणें, मुलूखगिरीला बाहेर पडावें, असें ठरलें. हा तह पूर्ण रीतीनें पाळला जावा अशाविषयीं सर्वांनीं शपथा घेतल्या होत्या; व ज्या अर्थी, सर्वांनीं जगत्सिंगाला आपला पुढारी असें कबूल केलें होतें, त्या अर्थी, त्यानेंही ती जबाबदारी स्वीकारली होती. हा जो राजसमूह एकत्र होऊन, तह आणि आणा शपथा झाल्या होत्या, त्या सर्वांचा हेतु इतकाच होता कीं, सर्व रजपूत राजांचें ऐक्य राहून, देशाभिमान आणि धर्माभिमान जागृत रहावा, व एकमेकाचे कल्याणाकडे एकमेकांचें लक्ष राहून परकीयाचें पाऊल आपल्या मुलखांत शिरूं द्यावयाचें नाही. ह्या तहाप्रमाणें आणि एकवाक्यतेप्रमाणें जर सर्व रजपूत राजे वागले असते, त्यानी एकमेकांचा पाठिंबा सोडला नसता, आणि रजपुतांचें पूर्ववैभव, शौर्य व जात्यभिमान हीं त्यांनीं स्मरून त्याप्रमाणें वर्तणूक ठेविली असती, तर त्या वेळीं मोंगल बादशाहीला जो उतार लागला होता त्या अनुकूळ काळीं, त्यांचें वैभव, शौर्य व जात्यभिमान ही शतगुणित वाढून, दक्षिणेकडून लुटालुटी करीत वरच्या उत्तरेकडील मुलखात प्रवेश करणारे जे मराठे त्याचें पारिपत्य करण्यासही त्यांना

---

"या कबूलीमध्यें कोणत्याही प्रकारें प्रतारण होऊन, आम्हाकडून तीं कलमे कधींही मोडलीं जाणार "नाहींत. श्रावण शुद्ध १३, वि० सं० १७९१ (इ० स० १७३५), मुक्काम हुर्ली.–

" १.–आम्ही सर्व एकजीव आहोंत. ही आमची एकात्मता आपत्कालात व सुखासमाधानाच्याही "वेळीं अढळ राहून, तिच्यापासून आम्हांपैकीं, कोणीही वेगळा होणार नाहीं; हे आम्ही आपला "धर्म आणि प्रामाणिकपणा स्मरून शपथेवर कबूल करीत आहोत. या शपथेच्या उलट आम्हांपैकीं "जो कोणी वागेल तो अधम, अप्रमाणिक आणि धर्मच्युत समजला जाईल. एकाचा जो मान "व एकाला जी लाज तीच आमची सर्वांची मान व लाज समजली जाईल. यामध्येंच सर्व कांहीं आलें.

" २.–एकाचा जो शत्रु तो सर्वांचा शत्रु समजला जाईल.

" ३.–पावसाळा संपल्यावर मोहिमेला निघावयाचें. आणि प्रत्येक मुख्याने आपापली फौज घेऊन "रामपुरा येथें जमावें. कोणा मुख्य संस्थानिकास येण्याला न फावेल तर त्याणे आपला कुमार किंवा "दुसरा कोणी आपल्या वतीचा, पण चांगला वजनदार मनुष्य पाठवावा.

" ४.–अशा कुमाराकडून, त्याला अनुभव नसल्यामुळें, जर कांहीं चूक झाली, तर ती राण्या-"वाचून दुसऱ्या कोणास दुरुस्त करण्याचा अधिकार नाहीं.

" ५.–कोणत्याही महत्कृत्याविषयीं सर्वांनीं एकवाक्यतेनें झटून तें कृत्य तडीस नेलें पाहिजे."

१. एकलिंग किंवा महादेव मेवाडच्या सिसोदिया वंशाचें कुलदैवत आहे. २. सीताराम हें दैवत अंबेरच्या राजवंशाचें आहे. त्या राजवंशाची मूळपीठिका दाशरथी रामचंद्रापासून आहे. ३. व्रजाधीश हें श्रीकृष्णाचें नांव असून, मारवाडच्या हाडा राजवंशाचें तें कुलदैवत आहे. ४. अभयसिंग हा एक मारवाडचा राजकुलीन पुरुष होता.

साहजिक आवेश आला असता. मेवाड, मारवाड आणि अंभेर येथील तिघेही राजे एकचित्त झाल्यामुळें, तें एक उत्तरेकडे फारच बलिष्ठ राज्य झालें होतें. यांनाच जर दक्षिणेकडून प्रबल होऊन गेलेले मराठे मिळाले असते, तर, रजपूत आणि मराठे ह्या दोघां प्रबल हिंदु जातींनीं हिंदुस्थानांत सर्वत्र हिंदुपदबादशाही केली असती. परंतु, केवळ भाषेच्या आणि वसतीच्या परकेपणामुळें, मराठे हे रजपुतांशीं मिळून मिसळून वागले नाहींत; व त्यामुळें, पुढें त्यांना त्या प्रकारच्या अनैक्याचें फलही मिळालें.

निजाम-उल्-मुल्क यार्णे दक्षिणेकडे आपल्याला अगदीं स्वतंत्र केलें. त्याचेवर दिल्लीहून बादशाहाचा एक सेनापति गेला होता. परंतु निजामानें कपटेंकरून त्या सेनापतीचें डोकें कापून, तें शिर उलट बादशाहाकडेच पाठविलें ! त्याणें रजपुतांशीं तह करून, पहिले बाजीराव यांस उत्तेजन दिलें; आणि त्यांचेकडून माळवा व गुजराथ या प्रांतांत स्वाऱ्या करण्यास सुरुवात केली. त्या वेळीं मराठ्यांना हरकत करण्यासाठीं बादशाहाचे तर्फे दायबहादूर ह्मणून एक सरदार माळव्याचे बाजूनें पुढें आला. परंतु तो मराठ्यांकडून मारला गेला. तेव्हां अंभेरचा जयसिंग याजकडे माळव्याची सुभेदारी देऊन, त्या प्रांताचें रक्षण करण्यासाठीं बादशाहाकडून नेमणूक झाली. परंतु, तोही मराठ्यांस मिळून, त्याणें तो सर्व मुलूख त्यांचे स्वाधीन केला. ह्याप्रमाणें बादशाहाचे अमलांतून माळवाप्रांत गेला. याचप्रमाणें गुजराथ प्रांताचीही स्थिति झाली. कारण, बादशाहीची डळमळीत स्थिति असल्यामुळें राठोडांना जीं बादशाहाकडून पूर्वीं मोठमोठीं वचनें मिळालीं होतीं तीं अपूर्ण राहिलीं; तेव्हां, अजितसिंगाचा मुलगा अभयसिंग याणें गुजराथचा सरदार सरबुलंदखान ह्यास घालवून, आपण अंभेरच्या जयसिंगाप्रमाणेंच बाजीरावास मिळून कांहीं मुलूख त्यांना घेऊं दिला; व कांहीं मुलूख आपल्या मारवाडच्या उत्तरहद्दीला मिळवून घेऊन, तो स्वस्थ राहिला. तिकडे, बंगाल, बहार व ओडिसा या प्रांतांत सुजा-उद्-दौला व त्याचा हस्तक सरदार अलिवर्दीखान हे मुख्य होऊन, अयोध्याप्रांतांत सादतखानाचा मुलगा सफदरजंग हा नबाब झाला. सादतखान याचा नांवलौकिक होऊन, इतक्या उदयाला तो येण्याला कारण बादशाह महंमदशाह हा झाला. ह्मणजे, बादशाहानें सादतखान यास वाढविलें. परंतु, तो असा अधम निघाला कीं, त्याणेंच दिल्लीच्या बादशाहीचा नायनाट केला, असें ह्मटलें तरी चालेल. कारण, सादतखान याणेंच नादिरशाहाला इराणाहून मुद्दाम बोलावणें करून, त्याजकडून दिल्लीवर स्वारी करविली. या स्वारीनें दिल्लीची बादशाही रसातळालाच पोहोंचविली. तों तिणें पुनः डोकें वर केलें नाहीं. ही स्वारी आली तेव्हां तिजवर सादतखान याचा मुलगा, वर

सांगितलेला सफदरजंग, हा बादशाहाचे वतीनें सेनापति होऊन लढण्याकरितां गेला होता. परंतु तो तरी कोणासारखा ? "यथा बीजं तथांकुरः !" त्याच्या बापानेंच जर ही नादिरशादाची स्वारी मुद्दाम आपल्या अन्नदात्या बादशाहावर आणिली होती, तर, त्या स्वारीला हरकत करण्याकरितां त्याचा मुलगा बादशाही लष्कर घेऊन जाणार, ही गोष्ट तर मुळीं असंभाव्य होती. आणि तोच अनुभव पुढें आला. त्याणें लष्कर घेऊन नादिरशाहावर जावयाचें; तों तो अधम उलट बादशाहाचे महालावरच चालून गेला; आणि तेथून पुढें अयोध्येवर जाऊन तेथें त्याणें आपली स्वतंत्र गादी स्थापन केली. ह्याप्रमाणें, दिल्लीच्या बादशाहीचे तुकडे तुकडे होत चालले. प्रत्येकजणानें फक्त "फिदवी-बादशाहे-गाजी" असे शिक्के करून, आपलीं राज्यें चालविलीं. बंगाल्यांत असणारे बादशाहाचे दिवाणांनीं मात्र दिल्लीदरबारचा कांहीं मान ठेविला होता. ते प्रतिवर्षी, आपल्याकडील खंडणी ह्मणून, पूर्वेकडील द्वीपसमूहांतून (मसाल्याचे बेटांतून) येणारा शंभर मोहोरांचा मसाला बादशाहाकडे पाठवीत असत. ही खंडणी पाठविण्यांत त्यांचा कांहीं वेगळा हेतु असून, त्यापासून मोठें फळ मिळविण्याची त्यांची इच्छा असेल; परंतु ते त्या वेळीं आपल्या यजमानाशीं कृतज्ञ होते, येवढें खरें. बादशाहाचे हे दिवाण ह्मणजे इंग्लंडांतून या देशांत त्या वेळीं व्यापाराकरितां आलेली 'ईस्ट इंडिया कंपनी' होय. तिनें मात्र बादशाहाचा अभिमान धरला होता. बादशाहाचे डोळे जाऊन, तो दोन्ही डोळ्यांनीं अंधळा झाला होता व त्याला कोणीही मानीनासें झालें होतें. तथापि, इंग्रजी कंपनीनें त्याचा मान जितका ठेववेल तितका ठेवला होता. या वेळीं बादशाहीचे दिवस व काळ सर्व फिरून, मराठ्यांचा उदयकाळ आला होता, ही एक गोष्ट; आणि दुसरें, इंग्रजांनीं, यद्यपि अभिमान बाळगून त्या अंध बादशाहाचा मान ठेविला होता, तथापि, तिकडे, बादशाहाशीं अधमपणा करून फितूर झालेला

१. "फिदवी-बादशाहे-गाजी." फिदवी=गुलाम, बादशाह=राजा, आणि गाजी=यशस्वी; याचा अर्थ:—'यशस्वी राजाचा गुलाम.' दिल्लीचे जे सरदार पुढें स्वतंत्र राजे व नबाब झाले त्यांणीं जे शिक्के केले होते त्यांजवर वरील अक्षरें कोरली होतीं, व त्यांवरून ते असें दर्शवीत कीं, आह्मी दिल्लीच्या बादशाहाचे हुकमानें त्याचे नौकर ह्मणून आपापलीं राज्यें करतों. परंतु हा केवळ बाहेरचा देखावा होता. मराठी राज्याचे तुकडे होऊन जीं निरनिराळीं राज्यें झालीं, त्यांतही पहिल्यानें "शाहूचरणीं तत्पर," असा शिक्काच चोहोंकडे वापरीत असत. परंतु, ही तत्परता शिक्क्यांतच काय ती होती. पहिल्यानें ती तत्परता सर्वांनीं आपल्या कृतींत दाखविली. परंतु पुढें त्या तत्परतेचें केवळ ढोंग होऊन, ती शब्दशेष मात्र झाली ! सातारा, कोल्हापूर वगैरे लुटून आणावीं; आणि 'शाहूचरणीं तत्पर' हे शिक्के वापरावे ! ह्मणजे, त्या शिक्क्यांत किती सद्धेतु होता तो उघड दिसतो ! हीच अवस्था दिल्लीच्या बादशाहीची झाली होती.

जो सफदरजंग अयोध्येचा नबाब झाला होता, त्याचाही पक्ष घेऊन, तो जरी वस्तुतः मूळचा बादशाहाचा हस्तक व वजीर होता तरी, त्यास 'लखनौचा बादशाह', असें ह्मटलें; अशा दोन्ही गोष्टींनीं दिल्लींची बादशाही बुडत आली होती, हें उघडच दिसत होतें. महंमदशाह याचे पुढें जे दोघे बादशाह दिल्लीच्या तख्तावर आले ते केवळ नांवाला मात्र होते. हा सर्व इतिहास वाचून पुष्कळ गोष्टी समजण्या-सारख्या आहेत. राष्ट्राच्या पतनोन्नति कसकशा होत असतात हें, मोंगलबादशाहीचा इतिहास समग्र वाचला ह्मणजे समजून येण्यासारखें आहे. बादशाह असो किंवा दुसरा कोणी संस्थानिक असो; त्याला जर लोकसाह्य आणि योग्य मदत नसेल तर त्याची ती बादशाही मातीमोल व्हावयाची हे यावरून कळून येईल.

माळव्यांत व गुजराथेंत मराठ्यांचीं ठाणीं कायम होतांच त्यांचीं मोठमोठीं सैन्यें टोळधाडीसारखीं नर्मदानदी उतरून, वर उत्तरेकडे भराभर चढूं लागलीं. त्या वेळीं होळकर, शिंदे, पंवार व आणखी इतर नांवें, जीं आजपर्यंत अगदीं एकीकडे कोनाकोपऱ्यांत व गैरमाहित होतीं तीं सर्वप्रसिद्ध होऊन, त्यांचे पराक्रम चमकूं लागले. त्यांनीं आपले नांगर, विळे, कोयते व आपलीं गुरें, मेंढरें, सर्व सोडून देऊन, हातीं तरवारी व भाले घेतले; आणि ते पुढें मैदानांत आले. यद्यपि, लढाया व युद्धे करण्याचा त्यांचा मूळचा लष्करी धंदा नव्हता, तथापि, ते आपल्या गृहीतकर्मांत इतके पुढें सरसावले कीं, ज्यांचें जन्मच क्षात्रकुलांत होऊन जे शौर्यवीर्यपराक्रमांत हिंदुस्थानामध्यें सर्वांच्या पुढें होते, त्या रजपुतांवरही ते विजयी होऊन, त्यांच्या मुलखांत त्यांनी आपली ठाणीं बसविली. हे मराठे तरी, शेवटपर्यंत एकविचारानें असते तर ते पहिल्यानें ज्याप्रमाणें आपला पराक्रम गाजवीत मुलूख घेत चालले होते, त्याचप्रमाणें त्यांचा पक्ष दिवसेंदिवस विशेष दृढ होऊन, एकमेकांच्या साह्यानें ते एकमेक विशेष बलवान् झाले असते. पहिल्या बाजीराव पेशव्यांचे कारकीर्दीपर्यंत ते सर्व एकविचारानें असून, जें काय करणें तें एकमेकांच्या मसलतीशिवाय करीत नसत. त्यामुळें, त्यांचे पुढें कोणता व कसाही प्रतिपक्षी आला तरी ते त्यास ह्मणून पाडल्याशिवाय कधींही राहिले नाहींत. नंतर ते सर्व मुलूखभर पसरले. बाजीरावसाहेब इ० स० १७३५ या वर्षी चंबळानदी[1] उतरून दिल्लीवर आले. बादशाहीची त्या वेळीं कशी काय स्थिति होती व दिल्लीदरबारची मराठ्यांशीं सामना करण्याची शक्ति होती किंवा नाहीं, हें सर्व, वर खुलाशानें कळविण्यांत

१. दिल्लीवर जातां जातां पहिल्यानें बाजीराव धवलपुरावरून चंबळानदी उतरून गेले. तेव्हां, धवलपुरास जेथून ते नदी उतरून गेले त्या ठिकाणीं एक घांट बांधला आहे व त्यास मराठी नांवानें अजून ओळखतात. त्या घांटाला 'भाऊघांट' असें नांव दिलेले आहे.

आलेंच आहे. बाजीराव आपल्या सैन्यासहवर्तमान दिल्लीपुढे येऊन उभे राहिल्या-वर, त्यांस कांहीं तरी पारितोषिक दिल्याशिवाय गत्यंतरच नव्हतें. तेव्हां, अर्थात्, एकंदर मोंगल बादशाही अमलांत मराठ्यांना चौथाई द्यावी असा बादशाहानें हुकूम दिल्यामुळें, बाजीरावाकडून दिल्लीदरबारास काडीमात्र उपद्रव न होतां, मराठ्यांची तेथून मोठ्या सन्मानानें रवानगी झाली. पहिल्यानेंच मराठ्यांना दिल्ली-दरबारांतून येवढा जय मिळाला, यावरून त्यांच्या पराक्रमास मोंगल लोक खचित फार भीत असावे, असें उघड दिसते. मराठ्यांची ह्याप्रमाणें दिवसेंदिवस भरभराट होत जाऊन, ते माळव्यांतही वस्ती करून राहिले, हें जेव्हां निजामानें पाहिलें, तेव्हां त्याला मत्सर व भीति उत्पन्न होऊन, मराठ्यांस असेंच अव्याहत वाढूं दिलें तर ते आप-ल्यालाही डोईजड होऊन, उत्तरेकडे आपला जो संबंध व दळणवळण आहे त्यास त्यांजकडून पुढें मोठी हरकत येईल, असे त्यास वाटूं लागलें. आणि, हा विचार करून, एकदम माळव्यावर स्वारी करण्याचा त्याणें बेत केला. निजामानें जी ही माळव्यावर स्वारी केली तिजमध्यें त्याला यश मिळाले. मराठे मागे हटले. ह्या जयाचे आवेशांत तो तसाच पुढें दिल्लीवरही जाणार होता; परंतु तिकडे नादिरशाहाची स्वारी येऊन धामधूम चालली होती. त्याचप्रमाणें, अफगाण लोकही बंडखोर हो-ऊन त्याणी काबूल आपल्या ताब्यात घेतले व तेथील दिल्लीदरबारचा अंमल अग-दीच उडवून दिला. यामुळें, नादिरशाहाचे स्वारीला विशेष जोर येऊन, व दिल्ली-कडे जाणें बिनधोक नव्हे असें निंजामाला वाटून, तो माळव्यांतच थबकून राहिला. ही गोष्ट इ० स० १७४० मध्यें घडली.

दिल्लीवर नादिरशाहाची स्वारी आली तेव्हा बादशाहाला मोठी आशा होती कीं, या अशा आणीबाणीच्या प्रसगी रजपूत लोक आपल्या साह्यास येतील. कारण, आ-जपर्यंत दिल्लीची बादशाही जी अशी पडत झडत तरी टिकली होती, ती केवळ र-जपुतांचे साह्यानेंच तग धरून होती. तेव्हां, ह्या वेळीही तेच रजपूत अभिमानानें आपला पाठिंबा राखतील, असें बादशाहास खात्रीपूर्वक वाटत होतें. परंतु, रजपु-तांचे मनांतून मोगल बादशाहाविषयीचा स्नेहभाव अगदीं नाहींसा होऊन, या वेळीं त्यांचेपैकीं एकही रजपूत दिल्लीदरबारच्या वतीनें नादिरशाहापुढें आला नाहीं. पूर्वी रजपूत राजांनीं दिल्लीच्या बादशाहाचे स्नेहामुळें आपली हजारों माणसें रणांगणीं बळी दिलीं, व आपणही धारातीर्थी पडले. परंतु, ह्या वेळीं कोणी एकही बादशाहाचें आमंत्रण न स्वीकारतां, सर्व रजपूत अगदीं तिऱ्हाइतांसारखे राहिले; तेव्हां, कसा तरी आलेला प्रसंग पार पाडला पाहिजे म्हणून, बादशाहाचा त्या वेळचा वजीर सादतखान व माळव्यांत येऊन पोंचलेला निजाम असे दोघे एकत्र होऊन, त्यांनीं

नादिरशाहाशीं सामना करण्याचें ठरविलें. परंतु त्या दोघांचेही करण्यांत कांहीं अर्थ नव्हता. सादतखानाचा अधमपणा व कपटभाव वर सांगितलाच आहे. निजामालाही दिल्लीच्या बादशाहीविषयीं कितीसा अभिमान होता हें, येथपर्यंत त्याचें जें वर्तन घडत आलें होतें त्यावरून उघडच दिसत होतें. शिवाय, त्याचे लोक त्या इराणी व पठाण लोकांपुढें दम धरून टिकण्यासारखे बिलकुल नव्हते. शेवटीं, कर्नाळ येथें मोठी लढाई झाली. त्या लढाईंत अमीर-उल्-उमराव सेनापति मारला गेला, सादतखात (वजीर) कैद झाला, आणि महंमदशाह (बादशाह) निखालसपणें नादिरशाहाचे हातीं सांपडला. ही गोष्ट अशी कांहीं चमत्कारिक रीतीनें घडून आली कीं, दंतकथेंत जी मत्सराची व हेव्याची गोष्ट सांगतात तिच्याप्रमाणेंच सर्व प्रकार झाला. सेनापति मारला तेव्हां निजामास सेनापतीची (अमीर-उल्-उमराव) पदवी मिळाली. परंतु, निजामाची जी दक्षिणेकडे वगैरे भरभराट झाली होती त्यामुळें, वजीर सादतखान याचे मनांत मत्सरानल भडकला होता; व त्याणें कपट करून, वरील दंतकथेंतल्या गोष्टीप्रमाणें, आपल्या प्रतिपक्षाचे दोन्ही डोळे जाण्याकरितां आपला एक डोळा गेलेला पतकरला, त्याप्रमाणें, निजामाचा पाडाव करण्याकरितां, तो नादिरशाहास फितूर होऊन, स्वत: नादिरशाहाचा कैदी झाला; आणि, त्याणें सर्व बादशाही शत्रूच्या स्वाधीन केली. तरी, नादिरशाहानें दिल्ली लुटून नासधूस करूं नये ह्मणून, सेनापति निजाम याणें त्याशीं खंडणी देण्याचें बोलणें लाविलें. परंतु निजाम जें करील त्याचे विरुद्ध आणि निजामाच्या नाशाला व अपमानाला कारण होईल असें कृत्य करण्याचा सादतखानाचा निश्चय असल्यामुळें, त्याणें नादिरशाहाला अनेक भलभलत्या गोष्टी सांगून, व दिल्लीमध्यें अतिशय संपत्ति आहे असें भासवून, ती लुटण्यास उत्तेजन दिलें. इतकेंच नव्हे; तर, निजामानें जी खंडणी देण्याचें कबूल केलें होतें ती खंडणी आपण स्वत: देतों, असें त्याणें नादिरशाहाशीं बोलणें लाविलें. नादिरशाह हा अतिशय द्रव्यलोभी असल्यामुळें, त्याणें निजामाचें बोलणें सर्व एकीकडे ठेविलें; आणि जो तहनामा होऊन करारमदार झाले होते ते सर्व मोडून, सादतखानानें उत्तेजन दिल्याप्रमाणें, एकदम दिल्लीशहर लुटण्यासाटीं त्याणें शहराच्या किल्ल्या बादशाहाजवळ मागितल्या. त्या वेळीं, बादशाह केवळ असहाय होऊन, त्याणें मोठ्या अपमानानें स्वतः नादिरशाहाचे गोटांत जाऊन, त्याचे स्वाधीन दिल्लीच्या किल्ल्या केल्या. त्यामुळें ता० ८ मार्च इ० स० १७४० या दिवशीं नादिरशाह हा दिल्लीचा बादशाह झाला.

ह्याप्रमाणें, तैमूरलंगानें दिल्लीस जी बादशाही स्थापन केली, त्या बादशाहीचा मालक इराणाचा बादशाह नादिरशाह हा होऊन, त्याणें त्याच वेळीं आपल्या नां-

याचें नाणें पाडण्याचा हुकूम दिला. त्या नाण्यावर त्याणें जीं आपल्या शौर्यवीर्यदर्श-नाचीं अक्षरें घातलीं, त्यांचा भावार्थ असा होता कीं, "जगांतील अवघ्या राजांवरचा मुख्य असा ह्या काळचा राजाधिराज नादिरशाह हा आहे."

ह्या वेळीं, दिल्लीच्या खजिन्यांत अतोनात संपत्ति होती. आजपर्यंत बादशाहीचे अवाढव्य आणि उधळपट्टीचे खर्च झाले; आणि इनामें, देणग्या, वगैरेंकडे अतोनात द्रव्य वांटलें गेलें; तरी, आणखी पुढें बादशाहाच्या चार पिढ्यांपर्यंत वाटेल तसें खर्च-ण्यास विपुल द्रव्य संग्रहीं होतें. ह्या द्रव्यामध्यें जडजवाहीर, सोनें आणि सोन्यारु-प्याचीं पात्रें हीं एकंदर चाळीस कोट रुपयांचीं होतीं. याशिवाय, बादशाहाच्या स्वा-रीचे लवाजम्यास लागणारे सर्व प्रकारचे थोर थोर अलंकार वगैरे, ते तर वेगळेच. ह्याप्रमाणें, बादशाहाचे वाड्यांत अगणित संपत्ति होती, ती सर्व संपत्ति नादिरशाहानें लुटून नेली. परंतु चमत्कार बघा कसा तो! इतकी संपत्ति ह्या इराणच्या बादशाहास मिळाली; ह्मणून त्याची तृप्ति झाली काय ? नाहीं. विस्तवांत यथेच्छ जळण घातलें ह्मणजे त्याणें जसा तो अग्नि विझून न जातां अधिक अधिक भडका घेतो व त्याला अधिकाधिक खा खा सुटते, तद्वत्, नादिरशाहाचा आशाग्नि अधिकाधिक भडकत जाऊन, त्याला द्रव्येंधनाविषयींची अधिकाधिक खा खा सुटली! त्याणें दिल्लीच्या लोकांवर अतिशय जुलूम करून, त्यांजपासून आणखी अडीच कोट रुपये दंडादाखल गोळा केले. नादिरशाहानें ह्या लोकांवर जो जुलूम केला तो कोणत्या प्रकारचा होता हें सांगणें, ह्मणजे वाचकांच्या अंगांवर शहारे उभे करून, डोळ्यांतून टिपें गाळण्याला मात्र कारण होणार आहे! ह्मणून थोडक्यांत इ-तकें सांगितलें ह्मणजे नादिरशाहाच्या त्या जुलमाची आणि अमानुष क्रौर्याची वाचकांना कल्पना करितां येईल, कीं, त्या संकटांतून कोणत्याही प्रकारें सुटका होण्याची बिलकुल आशा न वाटून, हजारों सभ्य व श्रीमान् लोक सुकुटुंब विष प्राशन करून, अथवा इतर प्रकारांनीं आत्मघात करून घेऊन, नादिरशाहाचे जुलमाला व राक्षसी क्रौर्याला आपखुषीनें बळी पडले! इतक्यांत दिल्लीमध्यें अशी भुमका उठली कीं, नादिरशाह मरण पावला. त्यावरून दिल्लीच्या लोकांना आवेश येऊन, त्या आवेशाचे झपाट्यांत त्यांणीं नादिरशाहाचे कित्येक इराणी लोक कापले. तें वर्तमान ऐकून नादिरशाहाचा कोपानल फारच भ-डकून, त्याचें क्रौर्य शिखराला जाऊन पोहोंचलें! तो तेथील एका मशिदीवर[1] उभा रा-हून त्याणें एकदम आपल्या सैन्यास हुकूम केला कीं, 'दिल्लींतील सर्व लोकांची कत्तल करा.' मग काय विचारावयाचें आहे! तो प्रत्यक्ष यमधर्माचाच हुकूम! हजारों लोक, स्त्रीपुरुष आणि बालकें यांचा भेद न राहूं देतां, एकसारखे कापून टाकिले!

---

१. ही मशीद अजून दिल्ली शहरांत दाखवितात.

मनुष्यांच्या सत्यानाशाबरोबरच लुटालुटीचीही कमाल झाली, हे सांगणें नकोच ! दिल्लीच्या रस्त्यांतून प्रेतांचे ढीगांचे ढीग पडले असून, त्यांमधून रक्ताचे पूर झाले होते ! नंतर दिल्लीशहराला आग लावून देऊन, त्या मेलेल्या लोकांस त्यांच्याच वसतिस्थानांत त्यांच्या घरांदारांसुद्धां जाळण्यांत आलें ! या सर्व दंग्यांत, यत्किंचित् समाधान मानावयाचें असल्यास इतकेंच आहे कीं, दिल्लीवर एकंदर अनर्थ आणणारा असा जो नराधम सादतखान त्याचाही अंत झाला. ती गोष्ट अशी:—दिल्लीशहरांतील एकंदर कत्तल व लुटालूट झाल्यावर नादिर यार्णे सादतखान यास सांगून पाठविलें कीं, 'तुझ्या व बादशाहाच्या एकंदर दौलतीच्या यादी, आणि निजामानें कबूल केलेली अडीच कोटींची खंडणी जी तूं देण्याचें कबूल केलें आहे ती, अशीं घेऊन मजकडे ये; नाहीं तर मरणास सिद्ध हो.' नादिरशाहाचा हा निरोप ऐकून सादत याची तर पांचांवर धारण बसली. इतका पैसा आणावा कोठून ? ही त्याला मोठी पंचाईत पडली. शिवाय, त्यार्णे जो अधमपणा करून, आपल्या हातें आपल्या धन्यावर व आपल्या एकंदर मनुष्यबांधवांवर हें असलें राक्षसी संकट आणून त्याचे योगानें सर्वांचा नि:पात केला होता, ती गोष्टही त्याला अतिशय खाऊं लागून, आतां पुढें काय करावें हें त्याला कांहींच सुचेना. त्याला जी महत्वाकांक्षा होती ती किती निरर्थक होती तिचें स्वरूप त्याला आतां मूर्तिमंत दिसूं लागलें. लोकांमध्यें त्याला तोंड काढण्यास जागा नाहींशी होऊन, आपण काहीं भलतेंच महापातकाचें कृत्य केलें, असा त्याचे मनाला धसका बसला; आणि तेणेंकरून, तोच आपला नाश करून घेण्यास प्रवृत्त झाला. त्यार्णे विषप्राशन करून आपला अंत करून घेतला; व तें पाहून, त्या वेळीं दिवाणाचे जाग्यावर असलेला जो राजा मजलीस राय त्यार्णेही त्याचप्रमाणें विषप्राशनानें आपला शेवट करून, नादिरशाहाकडून पुढें होणाऱ्या हालअपेष्टा आणि यातना यांपासून आपली सुटका करून घेतली. येणेंप्रमाणें, दिल्लीवर मुद्दाम हा अनर्थपात ओढून आणणारा जो नीचबुद्धीचा सादतखान, त्याचा अशा रीतीनें अंत झाला.

पुढें नादिरशाहाचा व बादशाहाचा तह झाला. त्या तहामुळें काबूल, थट्टा, सिंध आणि मुलतान हे पश्चिमेकडील सर्व प्रदेश नादिराचे ताब्यांत जाऊन, त्यार्णे ते इराणच्या राज्यास जोडले. आणि, तो तहनामा झाल्यावर, हा इराणचा महाक्रूर, निर्दय, घातुक आणि राक्षसी वर्तनाचा बादशाह, मोठी थोरली लूट घेऊन, तें उद्ध्वस्त व शुष्क झालेलें दिल्लीशहर सोडून आपल्या देशास जाण्याकरितां निघाला.

१. दिल्लीहून नादिरशाहाचा कूच होण्याचे वेळीं तर त्याच्या लोकांचें क्रौर्य आणि अनन्विताचार यांची अतिशयच वृद्धि होऊन परमावधि झाली. ही धामधूम आणि त्या दुष्टांचें अमानुष

त्या वेळच्या हिंदु इतिहासलेखकांनीं असें लिहून ठेविलें आहे कीं, "नादिरशहाचें

क्रौर्य हीं प्रत्यक्ष ज्याणें पाहून लिहून ठेविलीं आहेत त्याच्याच शब्दांचा खालीं आम्ही उतारा घेतों:—"एककालीं सर्व सुखानुभव घेणाऱ्या त्या दिल्ली शहरच्या लोकांच्या दुःखानुभवाची या वेळीं अगदीं कमाल झाली ! ह्या वेळेपर्यंत दिल्लीशहरांत चोहोंकडे सर्वसाधारण कत्तली चालल्या होत्या ! परंतु आतां पृथक् पृथक् व्यक्तिसंहार सुरू झाला ! प्रत्येक घरीं दुःखाक्रोश व रडारड ऐकूं येई. बैठेपगार देण्याच्या खात्यावरील मुख्याधिकारी वसंतराय याणें आपल्या सर्व कुटुंबाचा नाश करून आपलाही घात करून घेतला ! खालिक यारखान याणें आपल्या पोटांत खंजीर भोंसकून घेऊन आत्महत्या केली ! पुष्कळांनीं विष प्राशन करून आपलें आयुष्य संपविलें ! अधिकारी लोकांची दैना आणि अपमान तर कांहीं विचारूंच नका. दिल्लीच्या मुख्य फौजदारी अधिकाऱ्यास रस्त्यांत उभें करून फाड् फाड् जेरबंदांचे फटके मारले; आणि इतर बादशाही अंमलदारांस व कामदारांस निर्दयपणे वाटतील तसे चोप दिले ! सर्व शहरांतील शांति व निद्रारूप विश्रांति देखील नाहींशी झाली. इतक्यांत बादशाहाच्या फरासखान्याला आग लागली व एक कोट रुपयांचें सामान त्या आगीमध्यें जळून खाक झालें ! शहरांत धान्याचा दुष्काळ पडला ! जाडेभरडे तांदूळ रुपयास दोन शेर प्रमाणे मिळण्याचीही पंचाईत पडूं लागली ! याप्रमाणें, लोकांना पोटभर अन्न मिळण्याची पंचाईत आल्यामुळे, ज्याला जसें मिळेल तसें त्याणें खावें, असा क्रम चालून, त्याचा परिणाम, पुढें पटकीचा उपद्रव माजला, हा झाला. दररोज ह्या पटकीनें शहरच्या रस्त्यांतून मृत मनुष्यांची अगदीं दाटी दिसूं लागली. जिकडे तिकडे मनुष्यांच्या प्रेतांचे ढीग पडलेले दिसत ! याप्रमाणें दिल्लीशहर बहुतेक ओसाड पडलें. त्यामुळें कोल्हे, लांडगे वगैरे वनपशूंस आणि कावळे, गिधडें वगैरे पक्ष्यांस ती एकप्रकारे यथेच्छ मेजवानीच झाली ! ज्या दिल्ली शहरच्या मोठमोठ्या राजवीथींतून श्रीमान् सौदागर, व्यापारी आणि धनिक (सावकार) लोकांच्या रथांची व घोड्यांची गर्दी असल्यामुळें जें शहर नेहमीं मनुष्यांनीं गजबजलेलें असावयाचें, त्या बादशाही राजधानीच्या नगरांत, भरदिवसा, कोल्हीं, कुत्रीं आणि काक, गृध्र यांणीं स्वस्थपणें मनुष्यांचीं प्रेतें फाडून कुजलेलें मांस खात बसावें ! असा प्रसंग पाहण्याचे ज्या दुर्दैव्यांचे कपाळीं आलें, त्यांच्या दुःखोद्गारांचे वर्णन येथें किती तरी करावें ? आणि, अशी स्थिति जरी होती तरी नादिरानें जे लोक जीवंत राहिले होते त्यांजपासून कसे तरी आणखी पांच कोट रुपये काढलेच !"

ता० ५ एप्रिल रोजी सर्वत्र सामसूम दिसूं लागून, बादशाहाच्या सर्व अठरा कारखान्यांवरील नादिरशाहाच्या जप्तीच्या मोहरा काढण्यांत आल्या. नंतर नादिराकडून बादशाही अमलाखालीं येणाऱ्या सर्व मांडलिक राजांस व संस्थानिकांस हुकूम व जाहिरनामे जाऊन, चोहोंकडे स्वस्थता व शांतता झाल्याबद्दल कळविण्यांत आलें; व आतां माझा प्रिय बांधव (महंमदशाह) जो गादीवर बसेल त्याची आज्ञा सर्वांनीं मानली पाहिजे, असें त्याच जाहिरनाम्यांत वारंवार लिहून सर्वांनीं ध्यानांत धरण्याविषयीं सुचविलें होतें. त्याचप्रमाणें, उदेपूरचा राणा, मारवाड, अंमेर, नागोर व सातारा येथील राजे, आणि बाजीराव पेशवे इत्यादिकांस खलिते व यादी पाठवून, त्याणें त्यांना आपला विजय आणि आपलें दिल्लीच्या बादशाहीवरील स्वामित्व विदित होण्यासाठीं पुढें लिहिल्याप्रमाणें मजकूर लिहिला होता:—"आमच्यामध्यें आणि आमचा प्रिय बांधव महंमदशाह

त्यांच्या वेळीं एतद्देशीयांची स्वार्थपरता अतिशयच वाढली असून, कोणाकाही दुस-ऱ्याचें बरें कसें होईल, याजबद्दलचा विचार करण्याची जणूं काय कल्पनाच नव्हती. असा विलक्षण काळ त्या वेळीं आला होता. आपलें रक्षण आणि आपलें हित कसें होईल या पलीकडे कोणाच्या विचारांची धांव मुळींच गेली नव्हती. आपण सुखांत असलों ह्मणजे झालें; मग दुसऱ्याची पर्वा कोण करतो ? सद्गुणांचा लोप होऊन, ज्याणें त्याणें आपल्या पायांपुरतें पाहण्याचा क्रम चालविला होता. परंतु ह्यामुळें त्यांणीं आपला स्वतःचा किंवा दुसऱ्याचा मुळींच कांहींएक फायदा करून घेतला नाहीं. आणि तेव्हांपासून त्यांना कधीं सुखलाभ झाला नाहीं व कधीं त्यांचा पारतं-त्र्यांतून पायही निघाला नाहीं".

ह्या सर्व घालमेलीच्या व दंग्यांच्या काळांत रजपूत लोकांनीं आपापलीं राज्यें व संस्थानें संभाळलीं. इतकेंच नाहीं; तर सहाशें वर्षांत मोंगलांचे अमलामध्यें त्यांणीं आपलीं राज्यें मोठींही केलीं. त्यांत मारवाड व अंबेर या राज्यांतून आणखी अनु-क्रमें, बिकानीर व किसनगड हीं जोधपुरांतून (मारवाडांतून), आणि मछेरी व शेखावती हीं जयपुरांतून (अंबेरमधून), येणेंप्रमाणें निघून स्वतंत्र झालीं, व त्यांचें स्वातंत्र्य तीं अजून उपभोगीत आहेत. ह्याप्रमाणें, जयपूर व जोधपूर हीं राज्यें ब-रींच वाढलीं. तरी, मेवाडचें राज्य (उदेपूर) महंमद गिजनीच्या वेळीं दहाव्या शतकांत जेवढें होतें तेवढेंच ह्याही वेळीं होतें. बुंदी, अबू, ईदर आणि देवला या प्रांतांवर मेवाडचा अम्मल होता; परंतु तोही अलीकडे उठला होता. ह्मणजे, मेवा-डची सरहद्द पश्चिमेकडे अरवली डोंगराच्या अरण्यांपर्यंत जो गोदवाडचा पिकाऊ मुलूख आहे तेथपर्यंत; आणि पूर्वेकडे चंबळानदीपर्यंत. तसाच, उत्तरेच्या बाजूस

---

याजमध्यें एकात्मता आणि समता झाली आहे. ज्या अर्थी त्याचा आमचा सल्ला होऊन दोघांचेही मानसन्मान व राजेपणा हीं सारखींच आहेत त्या अर्थी, आह्मी दोघेही परस्पर प्रिय बांधव होऊन एकजीव–शरीर मात्र दोन–असे झालों आहोंत. आह्मां दोघांमध्यें प्रेमाचा स्नेहसंबंध झाला असून, आह्मांला आमच्या ह्या प्रिय बांधवाविषयीं सर्व प्रकारचा अभिमान आणि कैवार असणें अगदीं साहजिक आहे. आह्मी आपल्या प्रिय बांधवास त्याच्या विस्तृत राज्यावर पुनः संस्थापित करून, आह्मी दुसरे मुलूख जिंकण्यासाठीं जात आहोंत. तुह्मां सर्वांच्या पूर्वजांनीं ज्याप्रमाणें आ-मच्या या प्रिय बांधवाचे गादीला आजपर्यंत सर्व प्रकारचा मान देऊन त्या गादीची आज्ञा पाळिली, त्याचप्रमाणें ह्या तैमूरवंशीय आमच्या प्रियबांधवाचाही सर्वप्रकारें मान ठेवून त्याच्या आज्ञेंत तुह्मीं असलें पाहिजे. यांत जर तुह्मी चुकाल किंवा हयगय कराल, आणि दंगाफिसाद केल्याबद्दलची बातमी आमचे कानावर येईल, तर, आह्मी सृष्टीच्या इतिहासाचे पत्रांतून तुमचें नांव खरवडून टाकण्यास कधींही कमी करणार नाहीं. ह्मणजे, तुह्मी जन्मास आलां होतां कीं नाहीं असें करून टाकूं."

अजमीरच्या सरहद्दीवरील खारीमुलूख आणि दक्षिणेकडे माळवा, येथपर्यंत मेवाडचा अम्मल होता. येवढ्या मुलखाची लांबी ७० कोश व रुंदी ६५ कोश होती; आणि तेवढ्या चौरसचौरस मुलखांत दहाहजार शहरें व गांवें असून, त्यांचें उत्पन्न एक कोटीचें होतें. मेवाडच्या इतक्या मुलखांतच पण जमीन चांगली, लोक श्रीमान् आणि व्यापार मोठा असून, येवढ्या राज्याचें संरक्षण करणारी सरदार मंडळी मोठी शूर व अभिमानी असे. राजस्थानांतील शिरोभूषण असें मेवाडचेंच राज्य होतें. तरी पण पुढें पन्नास वर्षांतच मराठ्यांचा लुटालुटीनें बघा कसा काय त्या राज्याचा नायनाट झाला तो !

इ० स० १७३५ मध्यें बाजीराव पेशव्यांनीं दिल्लीचा बादशाह महंमदशाह याजपासून चौथाईचा हक्क मिळविला. ह्मणजे, बादशाही अमलांतील एकंदर वसुलांतून चौथा हिस्सा मराठ्यांना देण्याचा ठराव झाला. या समयीं मराठ्यांना फार चांगली व अनुकूल वेळ मिळाली होती. कीं, फारशा लढाया व दंगेधोपे वगैरे न करितां, त्यांना वरील चौथाईचा हक्क त्यांच्या झोंकावर आणि कीर्तीवर सहज मिळाला. चौथाईचा हक्क मराठ्यांना मिळाल्यावर अर्थात् ते विशेष विजयी झाल्यामुळें, पुढें त्यांणीं बादशाही मुलखाशिवाय इतर स्वतंत्र राज्यांकडे आणि संस्थानांकडेही आपली दृष्टि लाविली. पहिल्यापासून राजस्थानांतलीं सर्व लहान मोठीं संस्थानें मोंगल बादशाहांचे अमलांतलीं अशीं ह्मणण्यांत येत असत. आणि, ज्या अर्थी बादशाहानें आपल्या सर्व मुलखांतला चौथाईवसूल मराठ्यांना देण्याचा ठराव केला होता, त्या अर्थी, बादशाही अमलांतीलच राजस्थान ह्मणून तिकडेही मराठ्यांनीं आपल्या चौथाईचा हक्क दाखवून, त्याबद्दलची रजपूत राजांकडे मागणी केली.

राजस्थानावर हें एक नवीनच संकट आल्यासारखें झालें. मराठ्यांची चढती कळा असून, त्यांचा वचक फार मोठा असल्यामुळें, रजपूत राजांना हें संकट कसें दूर करावें याची एक मोठी पंचाईतच पडली. ते पुनः सर्व एकत्र जमून. त्याबद्दलचा विचार करूं लागले. त्यांच्यांमध्यें परस्पर उच्चनीचपणाचे आणि श्रेष्ठकनिष्ठ मानाचे जे भेद व अभिमान होते ते सर्व एकीकडे ठेवून, या वेळीं आपल्या मुलखाचें रक्षण कसें होईल याजबद्दलच्या योग्य तजविजी व योजना त्यांणीं चालविल्या. त्यांच्यांमध्यें वर सांगितलेले जे भेद व अभिमान होते ते सर्व सोडून, सर्व ठाकूर व राजे एकाच योग्यतेचे व समानाधिकारी असें समजण्याचा मुख्य मार्ग जो परस्पर विवाहसंबंध, तो घडण्याचें पहिल्या बैठकीस सर्व राजांनीं व ठाकुरांनीं ठरविलें. त्यांत सिसोदिया कुळांतली (राण्याची) मुलगी मारवाडचा राजपुत्र विजयसिंग यास देण्याची ठरली. पूर्वी मोंगलांशीं कोणत्याही प्रकारचा संबंध रजपुतांनीं ठेवूं नये असें

ठराव झाले असतां, निरनिराळ्या वेळीं ते ठराव मोडून अंमेरच्या राजानें दिल्ली-दरबाराशीं असंमत व्यवहार ठेवल्यामुळें, एकंदर राजस्थानांत जे निरनिराळे तट आणि अभिमान माजले होते ते सर्व ह्या वेळीं सर्वांनीं एका बाजूस ठेवून, एकचित्तानें आणि एकविचारानें वागण्याचा निश्चय केला; व त्या संबंधानें पुढें लिहिल्याप्रमाणें उदेपूर येथें परस्परांचे लेख झाले. त्या लेखांवरून सर्व रजपूत राजे मेवाडच्या राण्याला किती मान देत होते तेंही समजेल.

रजपूत राजांच्या एकवाक्यतेचा पत्रव्यवहार:—

## पत्र पहिलें.

"मारवाडचा राजपुत्र कुमार विजयसिंग याजकडून, महाराणा श्री-श्री-श्री जग-"त्सिंग यांचे चरणीं-मुजरा (नमस्कार).

"विज्ञापना विशेष, आपण रावत केसरीसिंग आणि दिवाण बिहारीदास यांस "मजकडे पाठवून आज्ञा केली कीं, मीं आपल्या कन्येशीं विवाह करावा. आपण "जो हा आपला हेतु कळविला येणेंकरून आपण आमचा मोठा सन्मान केला "असें मी समजतों, व हा आपला मजवर मोठाच अनुग्रह होत आहे असें "मला वाटतें. मी आपली ही आज्ञा शिरसा मान्य करतों. मी आतां आपला "मुलगा व सेवक झालों. जोंपर्यंत माझ्या देहांत प्राण आहे तोंपर्यंत मी आपला व आ-"पले कुटुंबांतील झालों. आपले ताब्यांत माझें मस्तक आहे, व खऱ्या रजपुतानें ह्या-"प्रमाणेंच वागलें पाहिजे. माझे २०,००० राठोड आतां यापुढें आपले सेवक झाले. "माझ्या कर्तव्यास जर मी विन्मुख होईन तर सर्वशक्तिमान प्रभु मला पाहतो आहेच. "मीचसा काय ? पण माझ्या रक्तापासून जो कोणी होईल तो आपली आज्ञा पाळील. "आपण घडवून आणीत असलेल्या या लग्नापासून होणारी पुत्रसंतति माझ्या गादीची "मालक होईल; आणि कन्यासंतति तुर्कांना न देतां, आपल्या विचारें योग्य वर बघून "त्याला देण्यांत येईल. असें जर मी न करीन तर मी खरा रजपूतच नव्हे. आपला "विचार घेतल्याशिवाय मी मुलींचीं लग्नें करणार नाहीं. इतकेंच नव्हे; तर भावोजी "किंवा इतर कोणी वडील मनुष्यें जर मला माझ्या मुली तुर्कांच्या घराण्यांत देण्यावि-"षयीं आग्रह करतील तर, तें मी कधीं कबूल न करितां, आपल्या विचारानेंच त्यांचीं "लग्नें करीन, याविषयीं मी ईश्वराची शपथ घेऊन आपल्यास कळवितों. ही गोष्ट दु-"सऱ्या कोणास मान्य होवो किंवा न होवो. ही विज्ञापना. आषाढ शुद्ध पूर्णिमा, गुरुवार, "वि० सं० १७९१ (इ० स० १७३५-३६).

"ताजाकलम—हा लेख रावत केसरीसिंग आणि बिहारीदास पंचोली यांच्या दे-"खतां कृष्णविलास ह्या मंदिराच्या सज्जांत पंचोली लालजी यानें लिहिला, व त्याजवर "कुमार विजयसिंग, मारवाडचा राजा बखतसिंग याचा पुत्र, यानें सही केली असे."

[1]. बापाला सन्मानपूर्वक हांक मारावयाची किंवा त्याचे विषयीं बोलावयाचें म्हणजे 'भावोजी' या बहुमानपूर्वक शब्दांनीं बोलण्याची रजपुतांची चाल आहे.

### पत्र दुसरें.

"विजयसिंग याजकडून राणा जगत्सिंग यांस—

"विज्ञापना, येथील सर्व कुशल असो. विशेष. आपला लोभ आणि आपलें प्रेम या "बालकावर ठेवून, आपल्या कुशल वार्तेनें व आमचा समाचार घेऊन, तो लोभ व तें "प्रेम वृद्धिंगत करीत असावें. ज्या वेळीं तो सुदिन (लग्नदिवस) मी बघेन त्या वे- "ळाची किंमत करतां येणार नाहीं. आपण मला खरा रजपूत बनवलें. ह्याबद्दल मी आ- "पले उपकार कधींही विसरणार नाहीं; व माझ्यानें आपली जी चाकरी होईल ती क- "रण्यास मी कधींही आळस करणार नाहीं. सर्व रजपूतजातीला आपण पितृस्थानीं "आहां; आणि त्याप्रमाणें प्रत्येकजण त्याच्या त्याच्या मगदुराप्रमाणें आपल्याला साह्य "करून आपला मान व आपला अधिकार कायम राखण्याविषयीं मनःपूर्वक झटत आहे, "व आपल्या शत्रूचें पारिपत्य करण्यास सर्वदा सिद्ध आहे. आपलें ज्ञान ब्रह्मदेवा- "च्यासारखें विस्तृत आहे. ह्या जगाचा जो स्वामी परमात्मा तो आमच्या राणेसाहेबांस "चिरसुखी करो. आषाढ वद्य १३."

### पत्र तिसरें.

"राजा बखतसिंग याजकडून राणा यांस—

"महाराणा श्री-श्री-श्री जगत्सिंगजी यांस बखतसिंग याचे प्रणाम. आपण मला "खरा रजपूत केलें व हा आपला अनुग्रह सर्व जगाला विदित झाला आहे. आपल्या "संबंधानें मला कोणतीही सेवा करण्याचा प्रसंग आला तर त्यास मी कदापि मागें सर- "णार नाहीं, हें आपल्यास अनुभवांतीं कळेल. आपला दर्शनलाभ जेव्हां मला घडेल "तेव्हां मी सुखानंदी होईन. मला आपल्या संबंधानें वेंबीच्या देंटापासून अभिमान आणि "पूज्य बुद्धि असल्यामुळें माझें अंतःकरण सदा सर्वकाळ आपल्याबरोबरच असतें! "आषाढ वद्य ११."

### पत्र चवथें.

"सवाई जयसिंग याजकडून राणेसाहेबांस—

"सवाई जयसिंग याजकडून महाराणे यांस सन्मानपुरस्सर नमस्कार. श्री. दि- "वाणजींच्या हुकुमाप्रमाणें मी, आपण मारवाडच्या अभयसिंगासहवर्तमान जो स्नेहसंबं- "धाचा करारनामा केला आहे तो मान्य करून त्याजवर सही करतों. याबद्दल मी हिं- "दूप्रमाणें शपथ वाहत नाहीं, व मुसलमानाप्रमाणेंही शपथ घेत नाहीं. माझ्या मान्यतेला "तो परमेश्वर साक्ष असून, दिवाणजींच्या समक्ष मीं ह्या दोस्तीच्या करारनाम्यावर सही "केली आहे. आषाढ शुद्ध ७."

### पत्र पांचवें.

"राजा बखतसिंग याजकडून राण्याला—

"आपलें खदखुरचें पत्र आलेलें पावलें. तें वाचून आनंद झाला. जयसिंगाकडून "आपल्याला पत्र येईल व माझेंही पत्र आपल्यास पोहोंचेल. आपल्या आज्ञेप्रमाणें त्या-

"त्याशीं स्नेहसंबंध केला आहे; व तो ह्याप्रमाणेंच सतत राखण्याविषयीं मी कधींही क-
"सूर करणार नाहीं. ह्याबद्दल आपण निःसंशय असावें. याचप्रमाणें आपणही आपला
"स्नेहसंबंध राखावा. आपण माझे वडील, बंधु किंवा मित्र ह्मणून जें आपण मशीं नातें
"ठेवाल त्या नात्याप्रमाणें मी आपला आहें. आपल्यावांचून मला दुसऱ्या कोणा आ-
"प्तांची किंवा इतर कोणा संबंधी मनुष्याची कोणत्याही प्रकारें काळजी नाहीं. आषाढ
"वद्य ६."

## पत्र सहावें.

"राजा अभयसिंगाकडून राण्याला—

"महाराणा जगत्सिंगजी यांचे हुजुरास, महाराजा अभयसिंग याजकडून प्रेमपुरस्सर
"नमस्कार. विज्ञापना विशेष. आपला जो परस्पर स्नेहसंबंध राखण्याबद्दलचा
"करार झाला आहे त्यास ईश्वर साक्ष आहे. व त्याच्या साक्षित्वानें केलेला हा करार जो
"कोणी मोडील त्याला देव पाहून घेईल, हें उघडच आहे. आपण सुखदुःखकाळीं एक
"आहोंत आणि अशाच एकमतानें आपण नेहमीं एकचित्त असावें. ह्यांत कोणींही
"स्वार्थबुद्धीनें आपल्यामध्यें भेद अथवा प्रतारणा करूं नये. ह्या सर्व ठरावांस आपले

---

१. अभयसिंग आणि बखतसिंग हे दोघे भाऊ असून, ते मारवाडचा राजा अजितसिंग याचे पुत्र होते. अजितसिंगाचे मागून मारवाडचे गादीवर अभयसिंग हा बसला; आणि बखतसिंग हा नागोरास स्वतंत्रपणें राहिला. बखतसिंगाचा मुलगा विजयसिंग असून, त्याशीं वर लिहिल्याप्रमाणें राणा जगत्सिंग याच्या कन्येचें लग्न होण्याचें ठरलें. शेवटीं मारवाडच्या, ह्मणजे जोधपूर येथील, गादीवर विजयसिंगच बसला. विजयसिंगानें वर ज्या आपल्या पत्रांत कृतज्ञतेच्या वगैरे अघळ-पघळ गोष्टी लिहून राण्याचे संबधानें जी आपली परम पूज्यबुद्धि दाखविली आहे, ती कृतज्ञता व पूज्यबुद्धि त्याणें शेवटपर्यंत राखिली असें दिसत नाहीं. त्याणें, पुढें, ह्या राजकीय खटपटींत आपल्या घरगुती संबंधानें मनांत कांहीं अढी बाळगून, आपल्या कृतज्ञतेच्या आणि पूज्यबुद्धीच्या विरुद्ध वर्तन केलें. त्याणें राण्याच्या नातवापासून पुढें गोदवाडप्रांत हिरावून घेतला, असें पुढील इतिहासावरून कळून येईल. वर सांगितलेल्या व ठराव झालेल्या विवाहसंबंधापासून विजयसिंगाला पुढें झालिमसिंग नांवाचा पुत्र झाला. परंतु हा झालिमसिंग, त्याचा वडील (सावत्र) भाऊ फत्तेसिंग जिवंत होता तोंपर्यंत आपल्या आजोळीं(उदेपुरास)च राहत असे. झालिमसिंग हा मोठा शूर, सर्वप्रिय आणि उत्कृष्ट कवि होता. ह्या मूळग्रंथ लिहिणाऱ्या कर्नेल टॉड् साहेबाजवळ एक रजपूत लोकांचा पुरोहित (यति) भाटांचे ग्रंथ वगैरे वाचून दाखवणारा मदतगार ह्मणून बारा वर्षेपर्यंत होता. तो यति वरील उत्कृष्ट राजकवि झालिमसिंग याच्या कृपादृष्टीखालींच लहानाचा मोठा झाला असल्यामुळें व त्याणें त्याच्याजवळ ग्रंथ लिहिण्याचें काम केल्यामुळें त्यालाही आपल्या यजमानाप्रमाणें-च इतिहासज्ञानाची आणि कवितेची गोडी फार असे; व त्यामुळें हा इतिहास इतक्या पूर्णतेस आ-णण्याला कर्नेल टॉड् साहेबाला त्याजकडून फार उत्तम मदत मिळाली. कर्नेल टॉड् साहेब ह्मणतो,-'मी राजस्थानांतले पुष्कळ भाट, त्यांचे पूर्वीचे ऐतिहासिक ग्रंथ समजावून घेण्यासाठीं पाहिले; परंतु त्या सर्वांत वरील यति त्या कामांत फार हुशार आणि ज्ञाता असा मिळाला.'

"सरदारही साक्ष आहेत; आणि खरा रजपूत आपले हे कारारमदार कधींही मोडणार
"नाहीं. आषाढ वद्य ३, गुरुवार."

वरील एकंदर पत्रांवरून, ह्या वेळीं रजपुतांची जी एकवाक्यता झाली ती चांगली दृढ पायावर झाली होती असें ह्मणण्यास हरकत नाहीं. परंतु अशा प्रकारची एकवाक्यता आणि परस्परांचे करारमदार यापूर्वीही नव्हते का झाले ? परंतु त्या एकवाक्यतेपासून व करारमदारांपासून काय फायदा झाला ? त्याचप्रमाणें, वरील पत्रांवरून कळून येणाऱ्या ऐकमत्याचा व एकात्मतेचाही सर्व लोकांना हितावह अथवा एकंदरींत बरासा फायदा ह्मणून पुढें झाल्याचें दिसत नाहीं. ज्याप्रमाणें, पूर्वी औरंगजेबाचे वेळेस ह्या रजपूतराजत्रयाची एकवाक्यता झाली असून, ती एकवाक्यता केवळ परस्परांच्या कुलाभिमानानें उत्पन्न होणाऱ्या मत्सरानें मोडली व त्याचीं दुष्ट फळें त्यांस भोगावीं लागलीं, तसाच मत्सरभावाचा प्रकार, ह्याही वेळीं, त्यांचे परस्पर करार व ठराव होत असतां जो ऊहापोह झाला त्या प्रसंगीं, उघड दिसून आला. व त्या विषारी मत्सराचें वजन व प्रसारही त्या समयीं फार दिसला.

मराठ्यांनीं माळवा घेतल्यावर त्यांचे पुढारी व सेनापति बाजीराव पेशवे हे जेव्हां चौथाई वसूल करण्याचे निमित्तानें मेवाडास गेले, तेव्हां त्यांचेविषयीं उदेपुरांत मोठा गवगवा झाला. राण्यानें बाजीरावांची प्रत्यक्ष भेट घेऊन चौथाईच्या

---

१. ह्या संबंधानें राणा जगत्सिंग यांजकडून दिवाण बिहारीदास पंचोली याला पुढें लिहिल्याप्रमाणें पत्रें गेलीं होतीं:—

पत्र पहिलें.

"स्वस्ति श्री. मुख्य प्रधान पंचोलीजी यांस—जोहार. विशेष, मला तुमच्याविषयींची स्मृति "कधींही सोडीत नाहीं. दक्षिणी (मराठे) लोकांविषयींच्या प्रश्नाचे संबंधानें तुह्मी जी व्यवस्था "लाविली ती बरी आहे; परंतु त्यांची (पेशव्यांची) भेट होणेंच असेल तर ती देवलाच्या पलीकडे "होण्याचें ठरवावें. कारण, जितकें दूर तितकें बरें. तुमच्या स्वारांतले कांहीं स्वार कमी करा; ह्मणजे, "ईश्वरकृपेनें पैशाची जास्त जरूर लागणार नाहीं गतवर्षाप्रमाणेंच रामपुऱ्याविषयींही ठरवून टाका, व "दौलतसिंगाला कळवा कीं, हा प्रसंग पुनः येणार नाहीं. आमच्या मातोश्रीसाहेबांस बरें नाहीं. "गजराव आणि गजमाणिक हे फार उमदेपणानें लढले. आणि, त्याचप्रमाणें सुंदरगजाच्याही हजारों प्रकारच्या क्रीडा झाल्या. त्या वेळीं तुह्मी हजर नव्हतां याबद्दल मला फार वाईट वाटलें ! "मी शोभारामाला कसें पाठवूं ? आषाढ वद्य ६, संवत् १७९१ (इ० स० १७३५)."

१. रजपुतांमध्यें वरिष्ठांनीं आपल्या हाताखालच्या कोणत्याही मनुष्यास 'जोहार' या शब्दानें मान देण्याची चाल आहे. २. राणा जगत्सिंग याला हत्तींच्या साठमारी व इतर क्रीडा यांची फार गोडी असे. वरील सर्व नांवें त्याणें आपल्या आवडल्या हत्तींना दिलीं होतीं.

बाबतींत बोलण्याचा प्रसंग मुळींच टाळिला; आणि आपल्या वतीनें त्याकुंभ्याचा

### पत्र दुसरें.

"मी त्यावर विश्वास ठेवीत नाहीं. म्हणून, त्याबद्दलचें प्रत्यक्ष म्हणणें आणि त्यांच्या मागण्या "काय आहेत त्याही कळविण्यासाठीं, कोणीतरी मनुष्यें मजकडे पाठवा. बाजीराव आला आहे; "व तो मजजवळून खंडणी घेऊन त्याबद्दल आपली कीर्ति पसरून जाणार. खंडणीशिवाय तो ज-"मीन मागतोच आहे. त्याणें माझ्या देशांत पाय शिरविला असून, तो हळूहळू मजजवळून इतर "राजांपेक्षां वीसपट पैसा—इतरांनीं खंडणी देण्याचें कबूल केल्यास त्या मानानें—ज्यास्त घेईल. "गतवर्षी मल्हारराव आला होता; परंतु तो कांहींच नाहीं. बाजीराव ज्यास्त शक्तिमान् आहे. "ईश्वराला जर माझी विनंति ऐकणें असेल तर बाजीराव माझ्या भूमीचा अपहार करणार नाहीं. "देवीचंदाकडून विशेष समजेलच. गुरुवार. संवत् १७९२.

"**ताजाकलम**—होळीच्या दिवशीं जगमंदिरांत वगैरे सर्वत्र आनंद होता. परंतु, मिठावांचून "जसें अन्न बेचव, तसा उदेपूरचा वरील सर्व आनंद बिहारीदासावांचून शोभेल काय ?"

### पत्र तिसरें.

"तुमचे सारखा मनुष्य माझेजवळ असतां मला माझ्या मजबुतीविषयीं बिलकुल भीति नाहीं. "परंतु हें दारिद्र्यदर्शन कां? कदाचित् तुह्मी विचाराल कीं, 'यांत मजकडे काय दोष आहे?—"मी आपण सांगतां त्याप्रमाणें वागतों.' तर ती गोष्ट अशी आहे: सर्व गोष्टींमध्यें पैसा हें सर्वस्व "आहे. पायांचे श्रम जे आहेत ते काय असतील ते तुह्मी समजा. इतर सर्व ठराव व्यर्थ आहेत. "तुह्मी ह्मणाल कीं, 'मजजवळ तर कांहीं नाहीं; तेव्हां मी तरी काय करूं आणि कसें ठरवूं?' "परंतु आपल्यावर असे दोन तीन प्रसंग पूर्वीच येऊन गेलेले आहेत. त्यांतून खरें पाहिलें असतां, "तुह्मी आणि मी अचुकपणें पार पडलों. त्याप्रमाणें पार पडण्यास आपले मोठमोठे बेत आणि आ-"पला शहाणपणा हीं आतां कांहींच उपयोगीं नाहींत. जरी मीं तुह्माला दूर पाठविलें आहे तरी "तुह्मी अगदीं माझे जवळ आहांत असें मी समजतों. परंतु, आतां तुह्मी लौकरच इकडे याल तर "बरें होईल. ह्मणजे मग आपल्याला जो काय पुरवठा वगैरे करावयाचा तो करूं. तुह्मी आपला कमी "पक्ष झांकण्यांत जसे कुशल आहांत तसा हा तुमचा पुत्र[1] आपला कमीपणा व आपलें वैगुण्य झां-"कून, त्याबद्दलची सफाई दाखविण्यांत वाकब नाहीं. तेव्हां, तुमच्या शहाणपणाच्या सांठवणाचा "उपयोग काय? त्याचा उपयोग जर तुह्मीं दाखविला नाहीं तर त्यामुळें संशय मात्र उत्पन्न होतो. "यासाठीं, तुह्माला आपल्या धन्याविषयींचा कांहीं अभिमान आणि माझ्या दरबारांत तुमचें स्वतःचें "महत्व वाढविण्याविषयींची इच्छा हीं असल्यावांचून तुमच्या त्या शहाणपणाचा व थोर अनुभवाचा "कांहीं उपयोग घडणार नाहीं. त्याबद्दल तुह्माला रत्नें व मोठमोठ्या देणगीचे दस्तैवज मिळतील. "तुमच्या श्रमांचें व मेहनतीचें सार्थक्य याजवांचून होणार नाहीं. तुह्माला वेळ असली तर ह्या सर्व

१. राणा जगत्सिंग याला दिवाण बिहारीदास हा पुष्कळच वडील असून, तो त्याला आपल्या बापाचे ठिकाणीं समजून, आपण त्याचा पुत्र (बेटा) समजत असे, व त्याचप्रमाणें तो आपले पत्रांत वगैरेही लिहीत असे.

अधिकारी व आपला दिवाण बिहारीदास पंचोली यांस बाजीरावांची भेट घेऊन त्यांबरोबर खलबत करण्यास योजिलें. त्या वेळीं त्यांच्या परस्पर भाषणांत राण्याची भेट कशी घ्यावी याबद्दलचा बराच खल होऊन शेवटीं असें ठरलें कीं, ज्याप्रमाणें बनेराचा राजा[1] राण्याची भेट त्याचे गादीपुढें बसून घेतो त्याप्रमाणेंच, बाजीरा-

"गोष्टी तुमच्या हातानें सुयंत्र होतील. नाही तर हें पत्र मी तुह्माला व्यर्थ लिहिलें आहे असें "होईल. तुह्मी ज्ञाते व सुज्ञ आहांत. पुढील परिणामावर लक्ष्य देऊन जें करणें तें करा. या बा-"बतींत मी तुह्माला दुसऱ्यानें पत्र लिहिणार नाहीं. सं० १७९२."

या पत्रांवरून दिवाण बिहारीदास पंचोली याजवर राण्याचा किती विश्वास होता व त्या दिवा-णाचेंही किती जबाबदारीचे काम होतें हें समजेलच. बिहारीदास याचे जे पुढें वंशज झाले त्यां-तील एक कृष्णदास पंचोली ह्मणून, हा ग्रंथ लिहिणाऱ्या कर्नल टॉड्साहेबाजवळ वकील असून, तो मेवाडच्या राण्याचे व कर्नल टॉड् याचेमध्यें दुभाष्याचें व इतर वकीलीचें काम करीत असे. तोही फार हुशार आणि कार्यकुशल होता असें टॉड्साहेबांनीं लिहिलें आहे.

पहिल्यापासून राण्याचा मान चोहोंकडे सर्वांकडून फार उत्तम रीतीनें ठेवण्यांत येत असल्याचें येथपर्यंत अनेक प्रसंगीं सांगण्यांत आलें आहेच. आह्मी या खालीं सातारच्या राजाकडून याच राण्याला एक पत्र आलेलें देतों. त्यावरून दक्षिणेकडे मेवाडच्या राण्यास किती मानीत होते हें समजेल:—

"स्वस्ति श्री क्षात्रकुलावतंस, सर्वमान्य, सर्वपूज्य, भास्करवत्तेजस्वी, महापराक्रमशाली, शत्रुप-"त्न्यांचे नेत्रांतून अश्रुपात करणारा (विजयी), महोदार, श्रीमन्महाराजाधिराज महाराणा श्री-"जगत्सिंगजी यांस—राजाधिराज श्रीमच्छत्रपति राजे यांजकडून रामराम. येथील सर्व कुशल आहे. "विशेष. आपलेकडून वारंवार कुशल वर्तमान कळविण्यांत येऊन आमचा समाचार घेण्यांत येत जावा "येवढीच अपेक्षा आहे; आणि तोच आह्माला संतोषप्रद आहे.

"आपलें कृपापत्र पंडित प्रधान यांस पावलें. बहुत आनंद वाटला व हा आपलेकडून आ-"मचा मोठा सन्मान झाला. राजश्री रावत उदेसिंगजी याची स्वारी इकडे आल्यापासून त्यांजवर "माझें प्रेम दिवसेंदिवस जास्त जास्त वृद्धि पावत आहे. आपला कृपालोभ असाच वृद्धींगत पावावा "बहुत काय लिहिणें ?"

असें ह्मणतात कीं, सातारचा राजा दुर्बल झाला तेव्हां दुसऱ्या जगत्सिंग राण्याकडे, त्याच्या वं-शांतील कोणी तरी योग्य राजा सातारच्या गादीवर बसविण्यासाठीं पाठवावा ह्मणून पेशव्यांनीं वि-नंति केली होती; व त्याप्रमाणें राण्याचा धाकटा भाऊ शिवदेवसिंग याला सातान्यास पाठविण्याचें ठरलेंही होतें. परंतु सातारची गादी त्या वेळेस विशेष वजनदार आणि श्रेष्ठ अशी मानली जात असल्यामुळें आपल्या हातें आपल्या कुटुंबांतून आपल्याला एक वरिष्ठ राजा निर्माण केल्यास चां-गलें नाहीं, अशी राण्याला भीति वाटली त्यामुळें त्याणें सातारचें आमंत्रण कबूल केलें नाहीं.

१. बनेराचा राजा हा प्रसिद्ध राणा राजसिंग याचा मुलगा भीम त्याचा वंशज होता. बाजी-रावाला दरबारांत जी जागा दिली तीच इंग्रज लोकांचे वकीलास देत असत.

यांनींही राण्याचे गादीपुढें बसून त्याची मुलाकत घ्यावी.[1] त्याप्रमाणें राण्याची व बाजीरावांची भेट होऊन तह झाला; व त्यांत मराठ्यांना राजस्थानांतून वार्षिक खंडणी देण्याचें ठरलें. पुढें, त्या तहाप्रमाणें व ठरावाप्रमाणें दहा वर्षेपर्यंत मराठ्यांना खंडणी पोहोंचत होती[2]. परंतु, पुढें पुढें, त्या खंडणीविषयींही मराठ्यांची कुरकुर चालली; तेव्हां राण्यानें तो झालेला तह मुळींच मोडून टाकला[3].

पुढें रजपूत राजांमध्यें आपसांतच कलह माजल्यामुळें मराठ्यांना त्यामध्यें पडून त्यांच्या अंत:प्रदेशांत शिरण्यासही सवड झाली. पूर्वी जयपूर (अंभेर), जोधपूर (मारवाड) आणि उदेपूर (मेवाड) यांच्यामध्यें राणा उमराव याचे कारकीर्दींत असा ठराव झाला होता कीं, उदेपूरच्या मुलीचा मुलगा वडील समजून गादीचा वारसा त्याजकडे जावा. नादिरशाहाची स्वारी येऊन गेल्यावर पुढें दोन वर्षांनीं, ह्मणजे इ० स० १७४३ या वर्षी, जयपूरचा राजा सवाई जयसिंग हा वारला. तेव्हां त्याचा वडील मुलगा इसरीसिंग (ईश्वरीसिंह) हा अंभेरचा राजा झाला. परंतु उदेपूरच्या कन्येचा मुलगा माधवसिंग हा एक मुलगा होता; व तो यद्यपि ईश्वरीसिंहापेक्षां वयानें लहान होता तरी, पूर्वी, वर सांगितल्या प्रकारचे ठराव झाले असल्यामुळें, माधवसिंगालाच ज्येष्ठपणा येत असून, त्यालाच जयपूरच्या गादीवर बसविणें रास्त होतें. परंतु तसें झालें नाहीं. यामुळें जयपूरच्या राज्यांत दोन फळ्या होऊन, ईश्वरीसिंगाचा एक पक्ष व माधवसिंगाचा एक पक्ष असे दोन पक्ष झाले. त्यांत माधवसिंगाकडचा पक्ष ज्यास्त बळकट होता. हा माधवसिंग ह्मणजे राणा जगत्सिंग याचा आतेभाऊ होता. अर्थात् राण्याचाही पक्ष त्याचेकडेसच होता. सिसोदिया वंशांतील मुलीचा मुलगा ज्येष्ठ व गादीचा मालक असें समजण्याचा ठराव असतां, अंभेरचा राजा जयसिंग याणें आपले पश्चात् त्याप्रमाणें व्यवस्था लावण्याविषयींची निरवानिरव कां केली नाहीं, हें समजत नाहीं; व त्यामुळें, पुढें तो मेल्यावर, वर लिहिल्याप्रमाणें जयपूरच्या राज्याविषयीं तंटे लागले. जयसिंगाकडून

---

१. बाजीराव पुढें जयपुरास (अंभेर येथें) गेले, तेव्हां तेथील राजानें त्यांस आपल्या गादीवर जागा घेतली. परंतु पेशवे ह्मणाले, 'आह्मी ब्राह्मण. आपल्या गादीपुढें बसून आपल्यापुढें हात पसरण्याचा अधिकार आमचा आहे. याजकरितां मानापमानास आह्मी विशेष मानीत नाहीं.' आणि, असें ह्मणून बाजीराव मोठ्या अदबीनें गादीच्या समोरच बसले.

२. ही खंडणी १,६०,००० रुपये असून, ती शिंदे, होळकर आणि पंवार या तिघांस सारखे तीन भाग करून देण्यांत येत असे. ही खंडणी वसूल करून घेण्याचें काम शिंद्याकडे असून, ती वाटण्याचें वगैरे काम होळकराकडे सोंपवलें होतें. मेवाडच्या राण्याला खंडणी देण्याचा प्रसंग मेवाडच्या एकंदर इतिहासांत हा पहिल्यानेंच आला.

३. पृष्ठ ३१२ यांतील टिपेंतील दुसरें, पत्र पहा.

पहिल्यापासूनच असें वरील ठरावाविरुद्ध वर्तन घडत असल्याचें दिसत होतें; परंतु त्या वेळीं त्याविषयीं कोणालाच संशय आला नाहीं. राणा संग्रामसिंग याजकडून आपला भाचा ह्मणून माधवसिंगाला रामपुऱ्याची जहागीर मिळाली असून, माधवसिंग हा लहानाचा मोठा तरी तेथेंच झाला होता; व पुढें त्या जहागिरीच्या भोगवट्याप्रमाणें, तो उदेपूरचा १००० स्वार आणि २००० पायदळांसहवर्तमान साह्यकर्ता ह्मणून एक सरदार व्हावयाचा होता. व ह्याप्रमाणें तो सरदारी करील अशी जयसिंगानें राणा संग्रामसिंगाशीं कबूलीही केली होती. त्याप्रमाणें, माधवसिंग हा लहानपणापासून जयपुराहून दूर आपल्या रामपुऱ्याच्या जहागिरीवरच होता आणि तेव्हांपासूनच राजा जयसिंग याणें त्याला तसेंच दूर राहूं देऊन, आपले मागून ईश्वरीसिंगानें जयपूरच्या गादीवर बसावें अशी योजना केली असावी, असें दिसतें. परंतु दुसऱ्या रीतीनें पाहिलें असतां, जयसिंगाकडून माधवसिंगाला वरील जहागिरीवर जाण्याविषयींच्या आज्ञेचें जें पत्र गेलें होतें तें त्याला 'चिमा' असें विशेषनांव देऊन लिहिलें आहे. आणि, 'चिमा' हें नांव अंभेरच्या राज्यांत जो गादीवर बसावयाचा त्या युवराजासच देण्याची चाल आहे; तेव्हां, जयसिंगाच्या हेतूंविषयींचा कोणाला संशय येण्याचेंही कारण नव्हतेंच. सारांश, ह्याप्रमाणें, जयपूरच्या राज्यांत कुटुंबकलहाला सुरुवात झाली. ईश्वरीसिंह (इसरीसिंग) जयपूरच्या गादीवर बसल्यानंतर चार वर्षेपर्यंत वरील कलहाचा उद्भव कांहीं एक दिसला नाहीं. परंतु चार वर्षांनंतर, ह्मणजे इ० स० १७४७ यासालीं इसरीसिंग हा आपली फौज घेऊन पंजाबांत दुराणी लोकांनीं जी पहिली स्वारी केली तिच्या पारिपत्याकरितां गेला. आतां, या ठिकाणीं त्या स्वारीचा पुढील इतिहास खुलाशानें देणें ह्मणजे बरेंच विस्ताराचें काम होणार आहे; व त्या इतिहासाचा संबंध अंभेरच्या इतिहासाशीं आहे. या करितां, प्रस्तुत हातीं घेतलेल्या उदेपूरच्या इतिहासाचे संबंधानें जेवढा इतिहास पाहिजे आहे तेवढा आपण घेऊन पुढें चालूं, ह्मणजे झालें.

इसरीसिंग पंजाबांत गेल्यावर, मागें माधवसिंगाच्या पक्षपाती मंडळीनें कट करून, इसरीसिंग जो एकदां जयपुरांतून बाहेर पडला आहे त्याला आतां पुनः ह्मणून परत येऊं द्यावयाचें नाहीं, असा निश्चय ठरविला. या कटांत माधवसिंगाचा मामेभाऊ राणा जगत्सिंग हाही सामील होऊन, त्यांच्या फौजा इसरीसिंगाला जयपुरास येतांना आडविण्यासाठीं ह्मणून पुढें सरल्या. त्या फौजांची व इसरीसिंगाची गांठ राजम-

---

१. अंभेरचा राजा 'सवाई जयसिंग' याणें आपल्या नांवाचें जयपूर शहर बांधून तीच अंभेरची राजधानी केल्यापासून, पुढें 'अंभेर' या जुन्या नांवाचा लोप झाला; व त्या जागीं 'जयपूर' हें नांव चालू झालें. यापुढेंही अंभेरच्या राज्याचा उल्लेख जयपूर या नांवानेंच करण्यांत येईल.

हाल येथें पडली. तेव्हां इसरीसिंगाला मराठ्यांचें साह्य मिळालें होतें. त्या लढाईत माधवसिंगाचे पक्षपात्यांचा पराजय होऊन, राण्याचे लोक तर मागें हटून पळून गेले. हें पाहून राण्याला फार राग येऊन, वाईटही वाटलें. त्याची फौज परत निघाली तेव्हां त्याणें आपली तरवार एका कलावंतिणीच्या हातीं देऊन तिला त्या फौजेमधून मोठ्या थाटानें चालविलें; व सर्व पराजित लोकांचा अपमान करून त्यांना लाजविण्याकरितां तो ह्मणाला कीं, 'या असल्या पडत्या काळांत पुरुषानें तरवार बाळगणेंही लज्जेचें आहे. आतां तरवार हातांत वापरणें हें रांडांचेंच काम आहे!' मेवाडच्या राज्याला जी उतरती कळा लागली होती त्या काळाला अनुसरूनच राणा जगत्सिंग याचे हे उद्गार होते, यांत संशय नाहीं. तो ह्मणाला, 'सिसोदियांचें शौर्य आणि पराक्रम नष्ट झाले.' व तें अगदीं खरें होतें.

ईश्वरीसिंहाचा जय झाल्यावर तो आपल्या साह्यकर्त्या मराठ्यांस घेऊन, तसाच, आपल्या प्रतिपक्षास साह्य करणारे जे कोटा आणि बुंदी येथील हाडावंशीय राजे त्यांजवर चालून गेला. ह्या वेळीं मराठ्यांचा मुख्य सरदार आप्पाजी शिंदा हा होता. त्या लढाईत कोटावाल्यांनीं मोठ्या शौर्यानें आपलें रक्षण करण्याचा प्रयत्न केला, व त्या झटापटींत शिंद्याचा एक हात गोळी लागून तुटला. शेवटीं, त्या दोन्ही संस्थानांची फार नुकसानी होऊन, त्यांना स्वारी करणारांशीं तह करून खंडणी दिल्याशिवाय गत्यंतर दिसलें नाहीं. राण्यानें इसरीसिंग कच्छवाहाचेंच उदाहरण पाहून, आपणही असेंच मराठ्यांचें साह्य घेऊन आपला कार्यभाग साधावा, असें मनांत आणिलें. त्याणें मल्हारराव होळकराला आपले मदतीस बोलावून त्याशीं अशी कबुलात केली कीं, 'इसरीसिंगाला गादीवरून काढून टाकल्यास ६४,००,००० रुपये मी त्या कामगिरीबद्दल तुह्मास देईन.' हा असा होळकराशीं राण्यानें ठराव केल्याचें इसरीसिंगाला समजल्यावर, त्याणें, पुढील अपमान सोसण्याचे भीतीनें, आत्मघात करण्याचा विचार केला. आणि, एका विषाचे प्याल्यानेंच त्याणें आपला अपमान चुकविला; ज्याच्यामुळें हें द्वैत माजलें होतें त्या माधवसिंगाला जयपूरचें राज्य मिळालें; होळकराचे कबूलीचे पैसे त्याच्या पदरांत पडले; राणा जगत्सिंग याचे हेतु व प्रयत्न सफल झाले; आणि मराठ्यांचा राजस्थानांत पक्क्या पायावर वजनशीर अंमल बसला. ह्याप्रमाणें, आजपर्यंत रजपुतांनीं जो सन्मान, लौकिक आणि बडेजावी मिळविली होती ती सर्व लयाला जाऊन, त्यांची विलक्षण प्रकारची मानखंडना झाली. राजस्थानांतील सर्व सरदार हतवीर्य आणि निस्तेज झाले, व ह्यापुढें त्यांच्या कोणत्याही समाजांत वजनदारपणा, सभ्यता आणि साभिमानपुरस्सर न्यायानुवर्तित्व हीं जणूं काय नाहींशींच झालीं! सर्वत्र लुटारूपणा, अपहारबुद्धि

आणि हलकटपणा असाच दिवसेंदिवस एकंदर राजस्थानांत दिसूं लागला. तो इ० स० १८१७ मध्यें इंग्रजसरकाराशीं राजस्थानांतील संस्थानिकांचा तह होईपर्यंत तसाच चालला होता. त्यानंतर सर्वत्रच शांतता आणि निरुपद्रविता पसरली !

वि० सं० १८०८ ह्मणजे इ० स० १७५२ या वर्षी राणा जगत्सिंग वारला. तो केवळ सुखोपभोगांच्याच नादीं असल्यामुळें त्याच्यामध्यें वजनदारी असावी तशी नव्हती. त्याचप्रमाणें तो अतिशय उधळ्या असून, हत्तींच्या साठमारींसारखे चैनाविलासांच्या खेळांतच बहुतकरून त्याचें लक्ष्य होतें. त्यावरून तो राज्यकारभारास आणि वर सांगितलेल्या मराठ्यांच्या वगैरे एकंदर धामधुमीच्या व अस्वस्थतेच्या वेळीं तर अगदींच अयोग्य होता. त्याला मराठ्यांना मागें हटवून आपला अंमल व आपलें वजन कायम राखण्यापेक्षां नानाप्रकारचे खेळ व तमाशे जास्त प्रिय होते. यावरूनच त्याजकडून आपलें राज्य कसें चालत होतें आणि सिसोदिया वंशाचें नांव कितपतसें राखलें जात होतें हें समजतें. त्याच्या राजकुळांत आजपर्यंत चालत आल्याप्रमाणें त्याणें कलाकौशल्याला चांगलें उत्तेजन दिलें, आणि आपला राजवाडा जास्त विस्तृत करून, दुसरेही अनेक महाल, जलमंदिरें आणि क्रीडास्थानें बांधिलीं. त्याणें पिशोळा येथील आपलीं क्रीडाद्वीपें सुशोभित आणि देखणीं करण्याकडे एकंदर २५,००,००० रुपये खर्च केले. उदेपुराजवळील लहान लहान टेंकड्यांवरून जीं उद्यानमंदिरें बांधलेलीं चोहोंकडे दिसतात तीं सर्व राणा जगत्सिंग याणेंच बांधिलीं; आणि, आज उदेपुरामध्यें जे आळशीपणाचे व मिजासीचे सण, चावटपणाचे उत्सव, जत्रा, मेळे, आणि तमाशे वगैरे चालू असलेले दिसतात, त्यांचा मूलोद्भवही राणा जगत्सिंग याचे कारकीर्दीपासूनच झाला[1]. ह्याप्रमाणें, ह्या दुसऱ्या जगत्सिंगाची उदेपूर येथील कारकीर्द संपली.

---

# भाग चौदावा.

## दुसरा प्रतापसिंग राणा.

दुसरा प्रतापसिंग राणा.—दुसरा राजसिंग राणा.—राणा उरसी.—होळकराची मेवाडावर स्वारी व त्या राज्यांत त्याचा हिस्सा.—राणा उरसी यास पदच्युत करण्यासाठीं बंड.—बंडखोरांकडून एक ढोंगी राणा (तोतया) उभा राहतो.—कोट्याचा झालिमसिंग.—तोतया शिंद्याला मिळतो.—त्या दोघांच्या फौजांवर राण्याची स्वारी; परंतु त्यांत राण्याचा पराभव.—शिंद्याची मेवाडावर स्वारी व उदेपुराला त्याचा वेढा.—राण्याकडून अमरचंदास प्रधानत्व मि-

---

१. पृष्ठ ३११ यांतील टिपेंत दिलेलें राणा जगत्सिंग याणें दिवाण बिहारीदास यास पाठविलेलें पहिलें पत्र पहा.

ळतें.—त्याचीं सरकूळें.—तो शिंद्याशीं सलुख करतो व शिंदा वेढा उठवून चालता होतो.—मेवाडच्या कांहीं प्रांत गमावला जातो.—बंडवाल्यांचे पुढारी आपल्या राण्यास शरण येऊन पुन: राजनिष्ठ होतात.—गोदवाड प्रांतावरचा अम्मल जातो.—राण्याचा वध.—राणा हम्मीर हा गादीवर बसतो.—राज्यकारभार चालविणारी त्याची आई आणि प्रधान अमरचंद यांचेमध्यें कलह.—अमरचंदाचें थोरपणाचें वर्त्तन, त्याचा मृत्यु आणि त्याचे स्वभावगुण वगैरे.—मेवाडच्या राज्याचा ऱ्हास.

पूर्वभागांत सांगितल्याप्रमाणें, इ० स० १७५२ त राणा जगत्सिंग दुसरा हा मेल्यावर, त्याचे मागून प्रतापसिंग हा मेवाडचा राणा झाला. हाही मेवाडच्या राजमालिकेंत याच नांवानें दुसरा राणा झाल्यामुळें त्याला 'दुसरा प्रतापसिंग राणा' असें ह्मणण्याची वहिवाट आहे. या राण्याचा इतिहास ह्मणजे अवघा तीन वर्षांचा काय तो आहे. तेवढ्या मुदतींत मराठ्यांच्या तीन स्वाऱ्या मेवाडावर झाल्या, व त्या संबंधाचा मेवाडच्या राज्यावर खर्चही फार पडला. ह्या तीन स्वाऱ्या ह्मणजे तीन पुढारी मराठी सरदारांकडून झाल्या. ते तिघेही सरदार इतिहासप्रसिद्ध असे सटवाजी, जनकोजीराव शिंदे आणि राघोबादादा पेशवे हे होते. या स्वाऱ्यां-पेक्षां दुसऱ्या प्रतापसिंग राण्याचे कारकीर्दीत दुसऱ्या कांहीं महत्वाच्या गोष्टी झाल्या नाहींत. ह्या राण्याला अंभेरचा (जयपूरचा) राजा जयसिंग याची मुलगी दिली असून, तिच्या पोटीं जो पुत्र झाला होता तोच त्याचे मागून उदेपूरच्या गादीवर बसला.

दुसऱ्या प्रतापसिंग राण्याचे मागून उदेपूरच्या गादीवर बसणाऱ्या राण्याचें नांव 'दुसरा राजसिंग' असें ठेविलें. या राजसिंगाचे पूर्वी त्याच नांवाचा जो राणा मे-वाडचे गादीवर बसला होता त्याचे गुणस्वभावांनला थोडाच अंश याचे अंगांत होता. त्याणें एकंदर सात वर्षें काय तें राज्य केलें. तेवढ्या मुदतींत मराठ्यांनीं पुन: तीन स्वाऱ्या मेवाडावर केल्या; व त्या तीनही स्वाऱ्यांचा खर्च उदेपूरच्या खजिन्यांतून भरावा लागला. त्या तीन स्वाऱ्या ह्मणजे, वि० सं० १८१२ (इ० स० १७५६) मध्यें राजेबहादरांची; १८१३ (इ० स० १७५७) त मल्हारराव होळकर आणि विठ्ठल शिवदेव विंचूरकरांची; आणि १८१४ (इ० स० १७५८) मध्यें रा-णोजी भुटे यांची. शिवाय, वि० सं० १८१३ (इ० स० १७५७) मध्यें सदा-शिवराव भाऊ, गोविंदराव आणि खानोजी जाधव या तिघांस मोठमोठ्या खं-डण्या द्याव्या लागल्या. वर राणा राजसिंग याचे ७ वर्षांच्या कारकीर्दीत तीन लढाया झटल्या खऱ्या; परंतु एकंदर स्वाऱ्या करणारांना ज्या खंडण्या द्याव्या ला-गल्या त्या निरनिराळ्या रीतीनें मेवाडच्या खजिन्यास सात ओघळी किंवा खड्डेच पडले ! शेवटीं शेवटीं तर राण्याला पैशाविषयीं इतकी चिंता पडली कीं, त्याच्या खजिन्यांत एक पैसाही शिलक नाहींसा झाला. त्याचें राठोड सरदाराच्या कन्येबरोबर

लग्न व्हावयाचें होतें. परंतु जवळ मुळींच पैसा नसल्यामुळें तो मोठ्या पेंचांत पडल्यासारखा झाला म्हणून त्याणें, मराठ्यांकडून खंडणी वसूल करण्यास आलेल्या तिघां ब्राह्मण सरदारांची विनवणी करून, त्यांजकडून लग्नासाठीं पैशाची मदत मागून घेतली; तेव्हां त्याचें लग्न झालें! पहा, काय कालदशेचा फेरा आहे तो! मेवाडच्या राण्याला आपलें लग्न करण्यास ब्राह्मणांची यांचना करून त्यांजकडून मदत घ्यावी लागली! असो. हा राणा मेल्यावर उदेपूरच्या गादीचा वारसा वांकडा फिरून तो त्याचा चुलता राणा उरसी याजकडे गेला.

राणा उरसी हा वि० सं० १८१८ म्हणजे इ० स० १७६२ मध्यें उदेपूरच्या गादीवर बसला. राणा जगत्सिंग हा अगदीं नीच व हलकट असल्यामुळें, आणि त्याचेपुढें जे प्रतापसिंग व राजसिंग हे राणे झाले ते अननुभवी असल्यामुळें, ज्याप्रमाणें मेवाडच्या राज्याला पतनकला येत चालली होती, त्याचप्रमाणें राणा उरसी हा मोठा हट्टी, दुराग्रही आणि मनस्वी असल्यामुळें मेवाडच्या राज्याला गतवैभवांतून वर काढण्याला त्याची कारकीर्द कोणत्याही रीतीनें उपयुक्त अशी झाली नाहीं. ह्या वेळेपर्यंत मेवाडच्या राज्याला एक पाऊलभर जागा जास्त जोडल्याचें तर मुळींच दिसत नाहीं. उदेपूरचा मुख्य कारभारी व दिवाण बिहारीदास पंचोली याचें फार वजन असून, त्याला सातारच्या म्हणजे मराठ्यांच्या सरदारांकडून फार मान मिळत असे; व त्यामुळें मराठ्यांचीही नेकी व प्रामाणिकपणा मेवाडच्या राज्यांत समजलीं जात असत. परंतु, सातारच्या राज्यांत जेव्हां फळ्या व तट पडले आणि मराठे सरदारही आपले तह व करार पाळण्याविषयीं कसूर करूं लागले, तेव्हां तर सर्वत्रच घोंटाळा आणि अनवस्था माजली. मराठ्यांमध्यें निरनिराळ्या टोळ्या होऊन, त्या सर्व टोळ्यांवर निरनिराळे सरदार पुढारी झाले; आणि सर्वांनींच लुटारूपणा आणि पुंडावीं मांडलीं. ज्याचें त्याचें लुटालुटीकडे लक्ष व स्वतःच्या हिताचा काय तो हेतु. त्यांणीं राज्यकारस्थानाच्या संबंधानें एकमेकांशीं ऐक्य करावें; परंतु तें ऐक्य फार दिवस न टिकतां, ज्याणें त्याणें स्वहिताकडेच लक्ष द्यावें, यामुळें सर्व देशांत फारच अस्वस्थता माजली. या संधींत मल्हारराव होळकराचा अम्मल फार वाढून व मेवाडचा बराच भाग त्याचे ताब्यांत जाऊन, तो त्या भागाचा मालकच झाला. मेवाडच्या गादीवर दुसरा प्रताप राणा बसला तेव्हां त्याला पदच्युत करून त्याचा चुलता नाथजी याला उदेपूरची गादी देण्याच्या खटपटी चालल्या होत्या. या कुटुंबकलहांत मल्हारराव होळकर हा मध्यस्थ होऊन त्या खटपटी जेथल्या तेथेंच राहिल्या; व त्या मध्यस्थीबद्दल होळकराला मेवाडांतला बराच मुलूख मिळून, तो त्या मुलखाचा धनी झाला होता.

राजकीय प्रकरणांत, परस्परांचा संबंध आणि त्यांचे एकमेकांवरील उपकार यांचा परस्परांस कांहीं उपयोग होईलच अशी कधींच कोणीं खात्री बाळगूं नये. राजकीय प्रकरणांत परस्परांची आप्तस्वकीयता आणि परस्परांचा उपकारीपणा यांचें बंधन फारसें टिकत नाहीं, असा अनेक प्रसंगीं अनुभव आलेला आहे. तें बंधन यत्किंचित् कारणानें आणि इवल्याशा स्वार्थावर नजर देऊन तट्कन् तोडण्यास परस्पर राजांना कांहींच वाटत नाहीं. म्हटलें असतां अंमेरचा माधवसिंग हा राण्याचा आप्त आणि त्याच्या सर्वांशीं अभिमानांतला व त्याचे आश्रयाखालीं राज्यपदावर आलेला; आणि म्हणून, त्याणें आपल्या उपकारकर्त्या व आपल्या आप्तांतल्या राण्याचे उपकार फेडण्यासाठीं आपलें पुष्कळ नुकसान सोसून, त्याच्यानें राण्याचे संबंधानें जेवढी कृतज्ञता दाखववली तेवढी त्याणें दाखविली. तेव्हां, राण्यानेंही आपला अभिमान आणि आपलें आप्तत्व समजून, माधवसिंगाचे कल्याणाकडे दृष्टि देऊन असावयाचें; परंतु तसें त्याजकडून घडलें नाहीं. राण्यानें, माधवसिंगाकडे जो रामपुरा प्रांत होता तो मल्हारराव होळकरास दिला. हा प्रांत राण्यानें आपल्या मुखत्यारीनें देण्याचा त्यास कोणत्याही प्रकारें अधिकार नव्हता. रामपूरा प्रांत होळकराकडे गेल्यामुळें मेवाडचा एक मुख्य अवयवच दुखवला गेला, असें म्हटलें तरी कांहीं हरकत नाहीं. होळकराकडे रामपूरा प्रांत गेला इतकेंच नव्हे; तर त्याजकडे हिंगळाजगड आणि बुदसू हेही प्रांत गेले. बुदसूला पुढें 'मल्हारगड' असेंही म्हणूं लागले. येणेंप्रमाणें अंताळगडापर्यंत होळकर येऊन पोंचला. शिवाय, बाजीरावांनीं मेवाडावर जी खंडणी बसविली होती त्या खंडणीमध्यें होळकराचा भाग होताच; व त्या खंडणीमध्यें सर्व मराठ्यांनीं समजून स्वस्थ असावें असें पूर्वीं ठरलें होतें. तरी, होळकरानें आणखी आणखी राण्याला पत्रें पाठवून आणि स्वारी करण्याचा धाक व भीति दाखवून जास्त जास्त पैसे काढण्यास कमी केलें नाहीं. त्याणें चंबळानदीवरील आपल्याकडे असलेल्या मुलखाची वसूलबाकी घेण्याकरितां म्हणून स्वारी केली; आणि तो तसाच पुढें मेवाडावरही आला. मेवाडावर येण्यापूर्वीं, वर लिहिल्याप्रमाणें त्याणें, राण्याला धाकदडपीचीं कांहीं पत्रें[1] पाठविलीं होतीं. परंतु त्या पत्रांस राणा दाद न देतां स्वस्थ होता. तों त्याची स्वारी आलीच. तेव्हां नाइलाज होऊन राण्यानें ५१ लाख रुपयांची भरती त्याला करून देऊन, त्याच्या स्वारीचें मेवाडावर आलेलें संकट दूर केलें. येणेंप्रमाणें होळकर मुलूख धुऊन नेत होता. त्याच वेळीं[2] होळकराचा अंमल वर लिहिल्याप्रमाणें अंताळगडापर्यंत येऊन पोंचला होता.

---

१. होळकरानें हीं जीं पत्रें पाठविलीं तीं दिवाण पंचोली यास पाठविलीं व तीं पंचोलीच्या दप्तरांत अजून आहेत. त्यांवरून त्या वेळची सर्व स्थिति समजते.

२. ही वेळ म्हणजे इ० स० १७६४ (वि० सं० १८२०).

इ० स० १७६४ ह्या वर्षी मेवाड प्रांतांत भयंकर दुष्काळ पडला. सर्व जिन्नस सारख्याच दरानें विकूं लागले. गव्हाचें पीठ आणि चिंच हीं सारख्याच दराचीं झालीं. रुपयाची एक शेर धारण झाली ! त्यानंतर चार वर्षेंपर्यंत आपसांतल्या लढाया, दंगे वगैरे सारखे चालूच होते. यामुळें मेवाड प्रांतांत अस्वास्थ्य आणि अशांति जणुं काय कायमचींच होऊन, त्या देशींतून, स्वाऱ्या करणार यांनीं लोकांना अगदीं धुऊन नेल्यामुळें, तो देश अगदीं निःसत्व झाला. ह्या प्रांतांतलें तें अस्वास्थ्य आणि ती अशांति सन १८१७ सालीं जेव्हां ब्रिटिश सरकारच्या अमलाखालीं तो सर्व मुलूख आला तेव्हांपर्यंत तशींच होतीं. तो प्रांत जेव्हां इंग्रज सरकारच्या ताब्यांत येऊन, तेथील राजे इंग्रजसरकारचे मांडलिक झाले तेव्हां तिकडील लढाया, दंगे, वगैरे सर्व बंद होऊन, लोकांना आपल्या जीवितवित्ताची आशा वाटूं लागली.

हे आपसांतले तंटे, लढाया आणि दंगे दिवसेंदिवस वाढत जाण्याचीं कारणें अनेक होतीं असें ह्मणतात. कोणी असें ह्मणतात कीं, हे आपसांतील तंटे आणि दंगे वाढण्यास असें कारण झालें कीं, जेव्हां मराठ्यांसारखे परकीय लोक येऊन स्वाऱ्या करूं लागले आणि आपल्यावर अंमल बसवूं लागले, तेव्हां, रजपुतस्थानांतले लोक देशाभिमानानें वेडे होऊन ते त्या परकीयांचा अंमल उठविण्यासाठीं असे दंगेधोपे करूं लागले. कोणी ह्मणतात कीं, राणा उरसी हा जो उदेपूरच्या गादीवर आला तो न्यायाप्रमाणें आला नाहीं. त्यानें आपला पुतण्या राणा राजसिंग दुसरा यास पदच्युत करून आपण मेवाडची गादी बळकाविली. तेव्हां हें लोकांस बरें वाटलें नाही. उदेपूरच्या गादीवर असा अन्यायी राजा असणें लोकांना बरें वाटेनासें झालें. आतां, राजस्थानच्या इतिहासांत राणा उरसी याचे संबंधानें त्याच्या ह्या अन्यायवर्तनाबद्दलचे संशय घेतलेले पुष्कळ ठिकाणीं आढळतात; परंतु त्याबद्दलचा प्रत्यक्ष आरोप त्याजवर करण्यासारखा पुरावा कांहींच सांपडत नाहीं. कारण कोठेंही, त्यानें राणा राजसिंगास पदभ्रष्ट करण्यासाठीं अमुक अमुक घोर कामें केलीं अशा प्रकारचें एकही उदाहरण मेवाडच्या इतिहासांत मुळींच आढळत नाहीं. नुस्तें, उरसी राण्यानें आपल्या पुतण्याकडून अन्यायानें गादी मिळविली, येवढ्या संशयाचे शब्द मात्र ठिकठिकाणीं आढळतात. यापेक्षां त्याचे संबंधानें संशय घेण्यास जास्त सबळ पुरावा मिळत नाहीं. तथापि, राणा उरसी हा मेवाडच्या गादीवर आला हें रजपूत लोकांचें एके प्रकारें दुर्दैवच होय असें ह्मणावें लागतें. वस्तुतः ह्मटलें असतां राणा उरसी याचेकडे उदेपुरची गादी येण्याचा कांहीं एक संबंध नव्हता. रीतीप्रमाणें पाहिलें असतां राणा उरसी हा जो उदेपु-

रच्या गादीवर आला तो तेथील राजमालिकेमध्यें एके प्रकारचा आगंतुकच राणा मध्यें शिरल्यासारखा झाला. कारण, वंशक्रमानें बघितलें तर त्याजकडे उदेपूरच्या गादीचा हक्क यावा इतक्या जवळचा तो राण्याचे वंशाला लागलेला नव्हता. राणा उरसी हा उदेपूरच्या दरबारांत सोळा सरदारांचे खालीं बसणारा आणि उदेपूरदरबारांत असलेल्या सरदारांचे पटांत दुसऱ्या वर्गांत येणारा असा असून, तो केवळ अज्ञान (बाबा) असल्यामुळें, त्याला मेवाडच्या दरबारांतून ३०,००० रुपयांची उक्ती नेमणूक प्रतिवर्षीं देत असत ह्मणजे झालें. शिवाय, राणा उरसी याचा स्वभाव इतका वाईट असे कीं, त्यानें, लहानपणापासूनच आपल्या संबंधानें आपल्या बरोबरीच्या लोकांत इतकी अप्रीति उत्पन्न करून ठेविली होती कीं, पुढें तो जरी एवढ्या मोठ्या पदावर आला तरी त्याच्या दुष्टपणाचा त्या लोकांना मुळींच विसर पडला नाहीं. तसेंच, एखाद्याला असें अकस्मात् वैभव प्राप्त झालें ह्मणजे त्याचे संबंधानें लोकांमध्यें जी पूज्यबुद्धि उत्पन्न होऊन लोक त्याला मान देतात, तशा प्रकारचा मान आणि पूज्यभाव लोकांकडून राणा उरसीचे संबंधानें मुळींच दाखविण्यांत येत नसे. कारण, त्याचा लहानपणापासूनच एकंदर वर्तनक्रम सर्व लोकांना माहीत असल्यामुळें त्याचे बद्दलची यच्चयावत् माहिती लोकांना कळून चुकली होती. आपलें वैभव आणि वजन मोठें आहे असें लोकांना भासविण्यास मुख्यत्वेंकरून, तें वैभव आणि वजन ज्यांजवर मिरवावयाचें त्यांना आपल्या लहानपणचा वर्तनक्रम माहीत नसला पाहिजे; व आपण लहानपणीं काय काय खोड्या व अन्याय केले त्यांचा दुर्लौकिक लोकांमध्यें पसरलेला नसला पाहिजे, ह्मणजे आपलें तें वजन आणि आपला तो अधिकार सर्व लोकांवर नीट रीतीनें बसतो. तशी गोष्ट राणा उरसी याची नव्हती. त्याचेविषयीं पहिल्यापासून लोकांमध्यें वाईट मत प्रसृत होऊन राहिलें होतें. कारण, त्याचें वर्तनच तसें खोडकरपणाचें आणि व्रात्यपणाचें होतें. तो गादीवर आल्यानंतर देखील त्याचेविषयींचा पूज्यभाव सर्व दरबारांतून नाहींसा होण्यास कारण त्याचें उद्धत वर्तनच झालें. दरबारांत आपल्या सरदारांशीं जितक्या सभ्यपणाचें व अदबीचें वर्तन ठेवावयास पाहिजे तितकें तो ठेवीनासा झाला; ह्यामुळें घरांतच वैर आणि शत्रुत्व माजल्यासारखें झालें. ज्याचें आपल्या स्वतःच्या दरबारांतच कोणाशीं पटेनासें झालें, त्याला बाहेरचे शत्रु कशाला पाहिजेत ?

उदेपूरच्या दरबारांत साद्रीचा ठाकूर असे. ह्या ठाकुराचे पूर्वजांनीं पूर्वी हळदीघांटच्या लढाईमध्यें मोठीं शौर्यवीर्याचीं कामें केल्यामुळें, सिसोदिया राजकुटुंबानें त्या वंशाचे सतत उपकार स्मरण्यासारखें त्यांचेकडून तें महत्कृत्य घडलें होतें; त्या वंशांतल्या त्या साद्रीच्या ठाकुरास ह्या राण्यानें एके वेळीं विनाकारण

कांहीं औपरोधिक भाषणानें दुखवून अतिशय संतापविलें. त्याचप्रमाणें, देवगडचा यशवंतसिंग ह्मणून एक सरदार राणा उरसीच्या दरबारांत होता, त्याच्या अंगवैक-ल्यावरूनच त्याला एके दिवशीं राणा उरसी हा कांहीं बोलल्यामुळें त्यालाही मोठा राग येऊन, त्याचे मनांत राण्याचे संबंधानें पुरा द्वेष बाणला. ह्या दोघां सरदारांनीं कट करून राणा उरसी यास पदभ्रष्ट करण्याची मसलत योजिली. त्यांणीं रत्नसिंग या नांवाचा एक तरुण मुलगा पुढें करून, हा माजी राण्याचा (दुसऱ्या राजसिं-गाचा) गोगुंड्याच्या ठाकुराचे कन्येच्या पोटचा मृत्यूत्तरजात पुत्र आहे असें प्रसिद्ध केलें. आतां हा मुलगा खराच माजी राणा राजसिंग याचा मृत्यूत्तरजात पुत्र होता किंवा कोणी तोतया उभा केला होता, हें कांहीं खास रीतीनें सांगतां येत नाहीं. या-विषयीं बराच वाद आहे. तथापि हा मुलगा खरा वारसदार ह्मणून उभा राहिल्या-

---

१. उदेपूरचें प्रसिद्ध दिवाणघराणें, ह्मणजे जो बिहारीदास पंचोलीचा वंश, त्याचेकडून मिळा-लेल्या महत्वाच्या कागदपत्रांतच, साद्रीच्या ठाकुराकडून, त्या वेळीं असलेला दिवाण यशवंतराव पंचोली यास आलेलें पत्र मिळालें आहे. त्यावरून, राणा उरसी हा साद्रीच्या ठाकुरास काय औ-परोधिक भाषण बोलला तें समजेल. तें पत्र आह्मी पुढें घेत आहों:—"दिवाण बहादूर यशवंत-राव पंचोली यांस—राजरूण रघुदेव (साद्रीचा ठाकूर) याजकडून प्रणाम. आपलें पत्र पावलें. प्राचीन काळापासून आपणां उभयतांचें सख्य असून, आपण आमचेवर सर्व प्रकारचा विश्वास ठे-वीत आलां आहांत. कारण आह्मी राण्याचे घराण्याविषयीं पहिल्यापासून मोठे राजनिष्ठ आहोंत. मी आपलेपासून मुळींच कधीं कांहीं चोरून ठेवीत नाहीं हें आपल्यास माहित आहेच. ह्मणून मी आपल्यास कळवितों कीं, फार दिवसांच्या चाकरीमुळें माझें मन कंटाळल्यासारखें झालें असून जीवाला थोडासा आराम आणि विसांवा देण्याचे हेतूनें, येत्या आषाढमासीं गयेस यात्रेला जाण्याचा माझा विचार आहे. माझा विचार मीं राणेसाहेबांस कळविला; परंतु त्यांजकडून औपरोधिक असें मला उत्तर मिळालें कीं, 'तुह्मी द्वारकेसही जा!' मी जर राहिलों तर, जैतजीच्या वेळेप्रमाणें माझ्या नेमणुकीचे गांव मला परत मिळतील. माझे पूर्वजांनीं उदेपूरच्या गादीची नौकरी मोठ्या इमानेंइतबारें केली असून, मीही माझे वयाच्या १४ व्या वर्षापासून ह्या गादीची नौकरी विश्वा-सानें आणि प्रामाणिकपणानें करीत आलों आहें. हा आमचा सर्व विश्वास, प्रामाणिकपणा, आणि इमानइतबार स्मरून, जर कांहीं मजवर दरबाराकडून कृपा होणें असेल तर हीच काय ती वेळ आहे." वरील पत्रांत रघुदेव ठाकुराला राण्याचें जें औपरोधिक असें उत्तर वाटलें त्याचें कारण, गयेस ज्याप्रमाणें सर्व प्रकारचे व सर्व धंद्यांचे लोक जातात तसे द्वारकेस सर्व प्रकारचे लोक जात नाहींत. द्वारकेला जाणारे यात्रिक ह्मणजे निरुद्योगी पुरुष, स्त्रिया, अशक्त व धर्मपरायण लोक, आणि वृद्ध व शौर्यपराक्रमहीन मनुष्यें हींच जावयाचीं असतात; असा त्या वेळीं सर्वांचा ग्रह झा-लेला असे. त्या ग्रहाप्रमाणें पाहिलें असतां, राण्यानें, रघुदेवाला 'द्वारकेसही जा' ह्मणून जें सां-गितलें, तें त्याला शौर्यपराक्रमहीनतादर्शक असें लावून भाषण होतें, असें कोणासही वाटण्याचा संभव होता.

वर त्याचे पक्षाला पुष्कळ लोक मिळून, त्याची बाजू विशेष सबळ झाली. कारण दरबारांतले सर्व सरदार राणा उरसी याला कंटाळून तो पदभ्रष्ट व्हावा अशी इच्छा करूनच होते. उदेपूरच्या दरबारांत जे मुख्य १६ मंत्री किंवा सरदार होते त्यांपैकीं, पांच सरदारांशिवाय बाकीचे सर्व सरदार ह्या कटांत मिलाफी झाले. हे पांच सरदार ह्मणजे साळुंब्रा (चोंडावत), बिजोली, अमाइत, गनोरा, आणि बेदनूर येथील ठाकूर होते. साळुंब्याचा ठाकूर पहिल्यानें ह्या कटांत मिलाफी झाला होता; परंतु, पुढें त्याणें, हा खरा वारसदार नसून, तो तोतया राजपुत्र आहे असें समजून, त्याचा पक्ष सोडून दिला. त्याणें असें करण्याचें कारण तरी आपल्या पूर्वजांप्रमाणें राणेवंशाशीं असलेली आपली राजनिष्ठा दाखविण्यासाठीं ह्मणून नव्हे; तर, ह्या एकंदर कटांत जे सरदार सामील झाले होते त्यांमध्यें भैंदर (सुक्तावत), देवगड, साद्री, गोगुंडा, देलवाडा, बैदला, कोटारियो, आणि कान्होर येथील ठाकूर त्याचेपेक्षां विशेष वजनदार आणि वरिष्ठ होते. तेव्हां त्यांचेपुढें आपलें कांहीं तेज पडणार नाहीं ह्मणून, त्यानें त्याचा पक्ष सोडून दिला. साळुंब्याच्या पक्षाचे विरुद्ध ज्या सरदारांचा पक्ष झाला त्या एकंदर पक्षास 'सुक्तावतपक्ष' असें त्याणें नांव दिलें. आणि तो ज्या पक्षाचा होता त्या पक्षास 'चोंडावतपक्ष' असें नांव मिळालें. ह्या नवीन तोतया राजपुत्राचा प्रधान डेम्रा कुळांतील वसंतपाळ नांवाचा सरदार झाला. ह्या वसंतपाळाचे पूर्वज बाराव्या शतकांत दिल्लीहून समरसिंग याचे बरोबर राजस्थानांत आले होते. वसंतपाळाचे पूर्वजांनीं, दिल्लीचा शेवटचा हिंदु चक्रवर्ती राजा पृथ्वीराज चव्हाण याचे कुटुंबांत मोटीं विश्वासाचीं आणि थोर अधिकाराचीं कामें केलीं होतीं; व तेव्हांपासून तो वंश राजकुटुंबामध्यें असलेल्या थोर पदवीचीं कामें करण्याविषयीं फार प्रसिद्धीस आला होता. आणि, आतां कित्येक शतकें जरी त्या वंशाला आणि त्याचे कर्तृत्वाला गुजरून गेलीं होतीं तरी, त्या वंशामध्यें, त्याच्या पूर्वाधिकाराचें दर्शक असें प्रधानपद जें मिळालें होतें तेंच अद्यापि त्याजकडे चाललें होतें. तोतया रत्नसिंग–ज्याला उदेपूरच्या दरबारांत फितूरी असें ह्मणत असत–त्याणें आपली राजधानी कुमळमेर येथें केली. तेथें त्याच्या रीतीप्रमाणें राज्याभिषेकसमारंभ होऊन, तेथून तो, राणा ह्या नात्यानें, सनदापत्रें लिहूं लागला.

जेथें जेथें असे कांहीं फितूरीचे प्रकार होऊन राजाचे विरुद्ध कट होतात तेथें तेथें ही एक मोठी चूक होते कीं, ते फितुरी व राजद्रोही आपला द्वेष आणि सूड उगविण्यासाठीं परक्याची मदत मागून घेतात आणि त्या मदतीनें ते परक्याचे मात्र गुलाम होतात. परंतु, त्यांचा त्यांना, आपला नावडता कां होईना, तो राजा बिलकुल सहन होत नाहीं; हें चांगलें नव्हे. आपल्या द्वेषाचे आणि शत्रुत्वाचे परिणाम आपल्या

इतर देशबांधवांना चिरकाल भोगावयास लावण्यासारखा अधमपणा दुसरा कोणताही नाहीं. असाच अधमपणा किंवा वेडेपणाची चूक ह्या तोतयाचे पक्षाकडून झाली. राण्याचे विरुद्ध कट करून केला; तर त्याप्रमाणें, मोठ्या करारीनें आणि मर्दुमकीनें राण्याचे पक्षाचा पराजय करून तरी गादी मिळावयाची असती; आणि ज्या लोकांस राणा उरसी हा नावडता झाला होता त्यांस सुखी करावयाचें असतें. परंतु, तसें तोतयापक्षाकडून झालें नाहीं. ह्या कामांत त्या पक्षाकडून मोठा गाफिलपणा झाला. तोतयानें आपल्या साह्याला आणखी शिंद्याला बोलावून, त्यानें जर राणा उरसी ह्यास पदच्युत करण्यांत आपल्याला मदत केली तर एक कोटी पंचवीस लक्ष (१,२५,००,०००) रुपये देण्याचा त्याशीं करार केला.

ह्या सर्व फितुरीचा आणि तोतयाचा प्रकार कोट्याचा ठाकुर झालिमसिंग ह्यास कळला. राजस्थानच्या आणि त्यांतही मेवाडच्या इतिहासांत झालिमसिंग हा मोठा राजकारस्थानी ह्मणून प्रसिद्धीस आलेला पुरुष होता. झालिमसिंगाचे संबंधाचा इतिहास प्रस्तुत स्थळीं सांगणें ह्मणजे अप्रासंगिक होईल; ह्मणून तो आह्मी तूर्त सांगण्याचे भरीस पडत नाहीं. कारण, त्याचा इतिहास ह्मणजे अल्पविस्तारानें होणारा नव्हे. त्याकडे आह्माला बरीच जागा द्यावी लागेल. त्याचा उदेपूरच्या राज्यक्रांतीशीं कसकसा संबंध घडून येऊन त्याजकडून ह्या प्रसंगीं काय काय विशेष गोष्टी झाल्या त्या त्या फक्त प्रसंगानुसार येथें कळविल्या ह्मणजे त्याचा इतिहास पूर्वापरसंबंधानें पुढें नीट समजून येण्याचा संभव आहे; ह्मणून आह्मी तसें करतों. मागें अंभेरचा राजा ईश्वरीसिंग यानें आप्पाजी शिंदा यास बरोबर घेऊन कोट्यावर स्वारी केली होती; (पृष्ठ ३१६ पहा.) कारण, माधवसिंगाला अंभेरच्या गादीवर बसविण्याच्या कटांत कोट्याचा ठाकुर ह्मणजे झालिमसिंगाचा बाप हा होता. व त्याकरितां ईश्वरीसिंगानें वर लिहिल्याप्रमाणें शिंद्याला घेऊन कोट्यावर स्वारी केली होती. त्या वेळींच झालिमसिंगाचें शौर्य सर्वांचे दृष्टीस पडलें, व त्या त्याच्या शौर्यावरूनच मराठ्यांचा व त्याचा स्नेहसंबंध जुळून, तो त्याचा स्नेहसंबंध मराठ्यांशीं पुढें पन्नास वर्षेंपर्यंत होता. झालिम हा अंभेरच्या राजाचे ताब्यांतील सरदार होता, हें वर सांगितलेल्या संबंधावरून वाचकांस कळेलच. परंतु, पुढें कांहीं कारणावरून अंभेरच्या राजाची त्याजवर अप्रीति होऊन, राजानें त्याला कोट्याहून हद्दपार केलें. तेव्हां तो उदेपुरास राण्याचेकडे आला. राणा उरसी यानें झालिमसिंगाचें बुद्धिमत्व आणि हुशारी बघून त्याचें नांव आपल्या सरदारांचे पटांत घातलें. आणि त्यास 'राजऋण' अशी पदवी देऊन चितोडगडच्या जमिनी वगैरे त्याच्या निर्वाहासाठीं दिल्या. येणेंप्रमाणें झालिमसिंगाची उदेपुरच्या दरबारीं सोय जमली. नंतर त्याचे

मसलतीनेंच राणा उरसीनें मराठ्यांचा सरदार रघु पागेवाला, आणि, दौला मिया ह्मणून एक मुसलमान सरदार होता तो, अशा दोघांना त्यांचे सैन्यासहवर्तमान आपले साह्यास बोलावून घेतलें; आणि, पूर्वीपासून पंचोलीवंशाकडे जी उदेपूरची दिवणगिरी होती ती त्या वंशाकडून काढून, उगरजी मेथा ह्मणून एक गृहस्थ होता त्याजकडे देऊन, त्याचे ताब्यांत दरबारचीं शिक्का मोर्तब वगैरे दिलीं. ह्या वेळीं, ह्मणजे, वि० सं० १८२४ किंवा इ० स० १७६८ ह्या वर्षी, महादजी शिंदा उज्जनीस होता; त्याचेकडे राण्याकडून आणि तोतयाकडून एकसमयावच्छेदेंकरून साह्यासाठीं मागणें गेलें. परंतु तोतयाची विनंति अगोदरच शिंद्यानें स्वीकारली असून, त्याला साह्याबद्दलचें त्याजकडून वचनही गेलें होतें. व खुद्द तोतया हा त्याचे जवळच क्षिप्रा नदीचे तटाकीं त्याच्या गोटांत निर्भयस्थलीं जाऊन राहिला होता.

राण्याचे सैन्यावर सालुंब्र्याचा ठाकुर हा मुख्य असून, शहापुरा व बनेरा येथील राजे हे झालिमसिंग आणि मराठे यांचे फौजेसुद्धां, एकंदर कट करून, शिंदा आणि तोतया यांच्या जोडगोटावर स्वारी करून गेले. व त्या स्वारीमध्यें त्यांना कांहीं वेळ जय मिळतोसा वाटला. कारण, त्या झटापटींत महादजी शिंदा आणि तोतया हे दोघेही उज्जनी शहरांत पळून गेले. ते शहरांत पळून गेल्यावर त्यांनीं कांहीं वेळ आपल्या फौजेची स्थिरस्थावर केली. तितक्या अवकाशांत त्यांना दुसरी आणखी फौज येऊन मिळाल्यामुळें ते पुन: ताजेतवाने झाले, आणि पूर्वीची लढाई पुन: सुरू झाली. त्यामध्यें रजपुतांची फार नुकसानी झाली. पहिल्यानें जो त्यांचा जय होतोसा दिसला, तो पूर्ण जय मिळाला असें त्यांस वाटून, ते बेफाम होऊन एकसारखे लुटालूट करावयास लागले. पण पुढें त्यांची अगदीं वाताहत झाली. सालुंब्रा, शहापुरा, आणि बनेरा येथील ठाकुर त्या लढाईंत मारले गेले; व दौला मिया, नरवरचा माजी ठाकुर राजा मान आणि साद्रीचा ठाकुरपुत्र राजा कल्याण हे जखमी झाले. झालिमसिंग हा ज्या घोड्यावर बसला होता त्या घोड्यास गोळी लागून तो त्याचे खालींच मरण पावला व खुद्द झालिम यास जखम लागून तो घायाळ होऊन रणभूमीवरच पडला. तेव्हां त्याला शत्रूच्या लोकांनीं कैद करून नेलें. तरी, प्रसिद्ध अंबाजी नांवाच्या मराठे सरदाराचा बाप त्र्यंबकराव यानें त्याचा फार चांगल्या रीतीनें समाचार घेऊन, त्याला उत्तम रीतीनें वागविलें. पुढें पराजय पावलेले आणि वाताहत व धूळधाण झालेले राण्याचे लोक उदेपुरास परत गेले. पण, तोतया शिंद्याचे जवळच त्याचा आश्रय करून उज्जनीस राहिला. तोतयाच्या पक्षाचे लोकांनीं शिंद्याला उत्तेजन देऊन, उदेपूरच्या गादीवर रत्नसिंगाला (तोतयाला) बसविण्याविषयीं फार आग्रह चालविला. परंतु शिंद्यानें ती गोष्ट बरेच

दिवस मनांत आणिली नाहीं. पुढें, त्याचे जवळ पुष्कळ सैन्य जमल्यावर त्यानें उदेपुरावर स्वारी करण्याची तयारी केली; आणि शेवटीं त्यानें त्या रजपूतनगरावर तोतयाचे पक्षानें चालून जाऊन त्यास वेढा घातला. राण्याकडे जय मिळण्याची आशा मुळींच नव्हती; व त्याचा पक्षही सबल नव्हता. राण्याचे पक्षपाती ह्मटले तर, उज्जनीस जो सालुंब्र्याचा ठाकूर मारला गेला ह्मणून वर ह्मटलें आहे त्याचा चुलता आणि त्याच्या मागून त्या संस्थानचा झालेला मालक जो भीमसिंग तो, आणि जयमल्लाचा वंशज बेदनूरचा मुख्य ठाकुर, हे दोघे काय ते राण्याचे पक्षानें त्या प्रसंगीं उदेपूरचे संरक्षक व राण्याचे पाठीराखे होते.

अशा प्रसंगीं उदेपुराचें संरक्षण होणें दूरापस्तच होतें. परंतु, त्या वेळीं अमरचंद बर्वा ह्मणून एक मोटा हुशार व्यापारी होता त्याचे शहाणपणानें उदेपूरचें नांव कांहीं तरी राखलें गेलें. राणा उरसीच्या अगोदर जे उदेपुरास राणे झाले त्यांच्या कारकीर्दींत अमरचंदाकडे कांहीं महत्वाचें काम आणि अधिकार होता. परंतु, उरसीच्या कारकीर्दींत सर्वच मनस्वी आणि स्वेच्छ कारभार चालला तेव्हां त्यामध्यें अमरचंदही आपल्या अधिकारावरून दूर झाला होता. त्यांत, अमरचंदाची तब्यत मोठी तलख असे. त्याला आपला अपमान सोसून एक क्षणभरही परवशतेमध्यें राहणें आवडत नसे. उरसी राण्याची तब्यत तर क्षणभंगुर होती; घटकेंत तो खुष व दिलदार असणार तों दुसऱ्या घटकेस नाखुष आणि बेदिल होणार! असा प्रकार असल्यामुळें, त्याचे ताब्यांत राहून आपला अधिकार व आपलें वजन ठेवणें अमरचंदासारख्या स्वातंत्र्यप्रिय आणि तलख तब्यतीच्या मनुष्यास साधणें कठिण होतें. तो इतका तापट स्वभावाचा असे कीं, प्रसंग पडला ह्मणजे राण्याला देखील बोलून त्याचें पाणी उतरण्यास कमी करणारा तो मनुष्य नव्हता. तेव्हां, अशा प्रकारचा मनुष्य, यद्यपि राजनिष्ठ, कर्तव्यतत्पर आणि हितेच्छु असला, तरी, उरसी राण्यासारख्या लहरी स्वभावाच्या राण्यास, आपल्या आश्रयाला ठेवणें कोठून आवडणार? ह्याप्रमाणें, अमरचंद हा आपला अधिकार राण्याकडे परत देऊन आपल्या मूळच्या व्यापारधंद्यास लागला होता. उरसी राण्याच्या कारकीर्दींत उदेपुरास जी अव्यवस्था झाली ती बघून अमरचंदाचा जीव फार व्याकुळ होई. परंतु त्याचा नाइलाच होता. सर्व लोक उरसी राण्याला कंटाळले होते; देशांत दारिद्य वाढत चाललें होतें; आणि बहुतेक राज्य सरदार लोकांच्या खुषीप्रमाणें आणि इच्छेप्रमाणेंच निरनिराळ्या ठिकाणीं चालावयास लागलें होतें. त्यामुळें उदेपुरावर अनेक संकटें येण्याची प्रतिक्षणीं भीति असे. अमरचंद हा उदेपूर दरबारापासून दहा वर्षेपर्यंत स्वतंत्र होता. तेवढ्या मुदतींत, उरसी राण्यानें आपल्या राज्यांत किल्ले, कोट, वगैरेंचे संरक्षणासाटीं

सिंधी जातीचे मुसलमान लोक नौकरीस ठेविले. आजपर्यंत राजस्थानांत–निदान मेवाडांत–मुसलमान मनुष्य चाकरीस न ठेवण्याचा अभिमान असे, तो अभिमान राणा उरसीनें सोडून त्यांस आपल्या शहरच्या बंदोबस्तासारखें महत्वाचें काम सांगितलें. याचा परिणाम नीट होणार नाहीं, असें भविष्य अमरचंदानें करून ठेविलें होतें व तेंच पुढें अनुभवास आलें. सिंधी लोक राण्यानें आपल्या तैनातीस ठेविल्यापासून, उदेपुरामध्यें आणि राण्याच्या एकंदर सैन्यांत असमाधानानें आपलें कायमचें बिऱ्हाड केलें; व त्यांचा स्वदेशाभिमान त्यांच्या मनांतल्यामनांतच राहून, त्याला बाहेर पडण्यास अवधि ह्मणून मिळेनासा झाला. जे तोतयाला मिळाले नाहींत ते देखील आपआपल्या घरांत स्वस्थ आणि उदासीन बसून राहिल्यामुळें, उदेपूरचें जीवित्व आणि संरक्षण यांचेविषयींच्या विश्वासाचें आणि भरंवशाचें निर्मूलन झाल्यासारखेंच झालें होतें. ह्यावेळीं राणा उरसी यास अमरचंदाच्या हुशारीचा आणि शहाणपणाचा अनुभव येण्यास एक आकस्मिक कारण झालें. तें असें:—

आजपर्यंत, उदेपुराला ह्मणण्यासारखें त्याचें संरक्षण होईल अशा प्रकारचा त्याचे भोंवतीं कोट किंवा खंदक नव्हता. राणा उरसीनें, उदेपूरच्या दक्षिणबाजूस एकलिंगगड नांवाचा एक मजबूत किल्ला बांधून त्यावर दारूगोळा वगैरे लढाऊ सामान भरून ठेविलें असतां आपल्या नगराचें संरक्षण चांगल्या रीतीनें होईल असें मनांत आणून, त्याप्रमाणें किल्ला बांधण्यास सुरुवात केली होती. परंतु, पुढें, त्यावर तोफा वगैरे चढविण्याचें काम फारच कठिण असल्यामुळें, एवढा सुळक्यावर उंच किल्ला बांधला तो व्यर्थ झालासें राण्यास वाटूं लागलें. एके दिवशीं राणा उरसी हा ह्या किल्ल्यावरील काम कसें काय चाललें आहे हें बघत फिरत असतां, तेथें अमरचंदही सहज इतरांसारखा ह्या नवीन किल्ल्याचें काम पहाण्यास आला होता. अमरचंद हा फार सज्जन असून दरबारच्या फार उपयोगी मनुष्य आहे, असें राण्याला पूर्वी अनेक वेळां अनेकांनीं सांगितलें असून, त्याच्याही मनांत अमरचंदाशीं बोलावयाचें होतें. वर सांगितलेल्यावेळीं किल्ल्यावर राणा उरसी आणि अमरचंद यांची सहज नजरानजर झाली. तेव्हां राण्यानें अमरचंदाकडे वळून ह्मटलें, 'हें सर्व काम पुरें होण्याला आणखी किती खर्च आणि वेळ लागेल बरें?' अमरचंदानें उत्तर दिलें, 'अन्नपाण्याचा पुरवठा आणि कांहीं दिवसांचा अवकाश एवढा मिळाला ह्मणजे किल्ल्याचें काम सहज पुरें होईल.' त्यावर पुढें राण्यानें त्यास कळविलें कीं, 'तुह्मी ह्या सर्व कामावर देखरेख ठेवून एवढें काम पुरें करून घ्या. ह्या कामाचे संबंधानें तुमचा हुकूम सर्वत्र अप्रतिबद्ध चालेल.' ह्याप्रमाणें, राणा उरसी यानें अमरचंदास एक महत्वाचें काम सांगितल्यावरून त्यालाही बरें वाटलें. त्यानें सर्व कामकरी लोक